या नाटकाचा प्रयोग १५ एप्रिल १९३९ रोजीं ग्वाल्हेर येथे रा. ब. लक्ष्मण भास्कर मुळ्ये, बी. ए., रेव्हेन्यु मिनिस्टर, यांच्या अध्यक्षतेखाली झाला. त्या वेळीं पुढील नटांनी कामें केलीं.

| | | |
|---|---|---|
| मन्दाकिनी | — | श्री. अरविन्द पाठक |
| सुहासिनी | — | श्री. श्रीकांत टिळक |
| मंजुळा | — | श्री. रणदिवे |
| विद्याधर | — | श्री. मामा केळकर |
| मोहन | — | श्री. वाय्. सदाशिव |
| सुधीर | — | श्री. बोकील |
| नानासाहेब | — | श्री. श्रीखंडे |
| भिकाजीपंत | — | श्री. कोचकर |
| जिवाजी | — | श्री. पागे |

## पात्रें

( प्रवेशाच्या अनुक्रमाने )

मन्दाकिनी

विद्याधर

जिवाजी

भिकाजीपंत

सुधीर

मंजुळा

मोहन

नानासाहेब

सुहासिनी

अंक १ : शनिवार– संध्याकाळ– पाच साडेपांचचा सुमार. बॅ. विद्याधर यांच्या बंगल्यांतील दिवाणखाना.

अंक २ : रविवार– दुपार– तीन-साडेतीनचा सुमार. सुहासिनीचें घर.

अंक ३ : रविवार– संध्याकाळ– सहा-साडेसहाचा सुमार. बॅ. विद्याधर याच्या बंगल्यांतील दिवाणखाना.

काळ : हल्लीचा.

स्थळ : मुंबई किंवा उपनगर.

# प्रस्तावना

आपण घरंदाज असावें असें कोणास वाटत नाही ! घरंदाज या नांवाने सूचित केलेले गुण निःसंशय श्रेष्ठ प्रकारचे आहेत परंतु केवळ पूर्वजांच्याच पुण्याईवर जिवंत राहून जेव्हा पोकळ मोठेपणाच्या आहारीं मनुष्य जातो तेव्हा तो चेष्टेचा विषय होतो. घरंदाजपणा हा आता व्यक्तिगत गुण नसून तो कुटुंबगत समजला जातो. सध्याच्या काळांत व्यक्तीची योग्यता तिच्या गुणांवरून मोजली जाते; व तें योग्यहि आहे. परंतु कुलपरंपरेचा अभिमान ज्यांना वाटतो, त्यांच्या या अभिमानास धक्का बसतांच कशी प्राणान्तिक अवस्था होते, हें या नाटकात एका सामाजिक प्रश्नाच्या साहाय्याने दाखविलें आहे.

प्रस्तुतचें नाटक लिहून बरेच दिवस झाले. परंतु कोणत्याहि नाट्यसंस्थेशीं परिचय नसल्यामुळे तें महाराष्ट्रांत रंगभूमीवर येऊं शकलें नाही. ग्वाल्हेर येथील 'आर्टिस्ट कंबाइन' या नाट्यसंस्थेचे उत्साही चालक श्री. वाय्. सदाशिव याच्या परिश्रमाने गतवर्षी तें रंगभूमीवर आलें व त्यामुळेच तें प्रकाशित करण्याचा विचार दृढ झाला. या नाटकांतील तीन भावगीतें राजकवि तांबे यांचीं असून एक 'विदर्भवीणे'चे संपादक श्री. ग. न. पंडित यांचें आहे. हीं भावगीतें घेण्याची परवानगी दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. नाटकाचें हस्तलिखित वाचून राजकवि तांबे, डॉ. खिरवडकर (ग्वाल्हेर), प्रा. कानेटकर (उज्जयिनी), श्री. ग. न. पंडित, व श्री. अण्णासाहेब कारखानीस (पुणें) यांनी व 'आर्टिस्ट कंबाइन'च्या नटवर्गापैकी श्री. वाय्. सदाशिव व श्री. कोचकर यांनी ज्या उपयुक्त सूचना केल्या त्याबद्दल त्यांचे आभार मानणें आवश्यक आहे.

लश्कर–ग्वाल्हेर<br>
२–७–४०

ना. बा. पराडकर

# १

[ बॅरिस्टर विद्याधर याचा आधुनिक पद्धतीने शृंगारलेला दिवाणखाना. दिवाणखान्याची व्यवस्थित माडणी. बॅरिस्टर विद्याधर व त्यांची पत्नी मन्दाकिनी यांच्या सुसंस्कृत अभिरुचीचीच निदर्शक म्हणावयास हरकत नाही. दिवाणखान्याच्या भिंती, पडदे, फर्निचर यात एक प्रकारचा सुरम्य मेळ असून मोतिया रंगावर विशेष प्रेम आहे ही गोष्ट स्पष्ट दिसून येते.

प्रेक्षकांच्या उजव्या बाजूस बॅरिस्टर विद्याधर यांच्या खोलींत जाण्याचा रस्ता. त्याच्या पलीकडे वर जाण्याचा जिना. जिन्यापलीकडे भिकाजीपंत कारकून यांचें ऑफिस. प्रेक्षकाच्या डाव्या बाजूस बॅरिस्टर विद्याधर यांच्या खोलीसमोर मन्दाकिनीबाईची खोली. खोलीपलीकडे बरोबर जिन्यासमोर आंत जाण्याचा रस्ता.

समोर कठड्यावर उभारलेलें ग्राउंड ग्लासचें पार्टिशन.

डाव्या बाजूच्या वरच्या कोपऱ्यांत बाहेरून आत येण्याचा रस्ता.

मन्दाकिनी अस्वस्थ मनाने फेऱ्या घालीत असून "मी चालतां वाट !" या भावगीताचे चरण गुणगुणत आहे असा देखावा.]

मन्दाकिनी – (धावत विद्याधराकडे जाते) विद्याधर, किती उशीर केलांत ? कांही सीमा ! माणसान वाट तरी किती पाहायची !

विद्याधर – पण वाट पाहण्याचं कारण काय ? अशी काय मध्यरात्र झाली आहे ! असा मला उशीर तो कितीसा झाला ! मी काय लहान मूल आहें का मला कोणी पळवून नेणार आहे ? तुझ्या वाट पाहण्याचा मला तर अर्थच कळत नाही ! मंदा, तूं अगदी बेबी आहेस बेबी ! (जिवाजी टपाल घेऊन येतो.)

मन्दाकिनी – ही घ्या तुमची आवडती डाक. (जिवाजीस) जिवाजी, तुला ही डाक आणायला कुणीं सांगितली ? (विद्याधर आणि मन्दाकिनी यांच्याकडे आळीपाळीने पाहतो.)

जिवाजी – साहेबांची ताकीद हाय ताईसाब. आतां आपन हुकूम देल्याल तर ह्यो चाललों परत.

विद्याधर – जिवाजी, आण ती डाक इकडे. (जिवाजी मन्दाकिनीकडे पाहतो व मन्दाकिनी पत्राकडे कठोरतेने पाहते. जिवाजी जातो). कां इतक्या कठोरतेन पाहतेस त्या पत्रांकडे ? त्यांच्याकडे काय दोष ? त्या पत्रांबद्दल कशाला हा सवतीमत्सर ? काय ? आता ह्या रागाच्या भरांत आम्हांला चहा मिळणार कीं नाही ?

मन्दाकिनी – पण आता तुम्हांला चहा पाहिजे कशाला ? हीं पत्रं प्रथम पाहा. सहज अर्धा तास तरी लागेल. किती उत्सुकतेन घेतां तीं पत्रं वाचायला ! कसलीं पत्रं तीं ! एक विमा कंपनीची रसीद तर दुसरं सभेचं छापील आमंत्रण. दोनचार अशिलांचीं तर बाकीचीं पांचसात त्या तुमच्या घाणेरड्या संस्थेचीं.

विद्याधर – (हसत) आता यापुढ मला लव्ह लेटर्स का येणार आहेत ? गुलाबी लिफाफा, कोपऱ्यांत नाजुक हातान लिहिलेला पत्ता. पत्र हातांत पडतांच कोणी न पाहील अशा बेतान आपल्या खिशांत हृदयाजवळ ठेवायचं आणि एकान्तांत थरथरत्या हातान उघडायचं ! आता अशीं का मला पत्रं येणार आहेत ? मन्दा, आणि आलीं तर तुला चालतील का ?

मन्दाकिनी – आणि मला आलीं तर चालतील का ?

विद्याधर – हो चालतील ! पण तूं पाठविलेलीं नाही चालणार ! आपल्या रूपगुणांनी तूं जगाला वेड लावलंस तर त्यांत मला अभिमानच वाटेल !

मन्दाकिनी – अभिमान ! कसला ?

विद्याधर – कां अभिमान वाटू नये ? याचा अर्थ असा नव्हे का की जगाचं प्रेम धिक्कारून तूं माझ्यावर प्रेम करतेस ? प्रेमाच्या चढाओढींत यशस्वी झालेल्या या उमेदवाराकडे सारं जग कौतुकान पाहणार नाही का ?

मन्दाकिनी – तुम्ही कांही तरी चमत्कारिक बोलतां झालं ! विद्याधर, आज शनिवार आहे; उद्या तुम्हांला कोर्ट नाही, आणि परवा पण सुट्टी आहे. वा ! हे तीन दिवस आपण आनंदांत घालवूं ! आज संध्याकाळीं फिरायला जाऊं. नंतर सिनेमा आणि वाटल्यास एखाद्या उत्तम हॉटेलांत जेऊन परत येऊं ! आणि उद्या माथेरानला जाऊं !

विद्याधर – तूं तर हनिमूनचाच बेत केलेला दिसतोय !

मन्दाकिनी – काय करणार ! सध्या ही फुलपाखराची वृत्ति इतकी बळावली आहे की लग्नाच्या बायकांना नवऱ्याला मुठींत ठेवायला अशाच योजना कराव्या लागतात ! पण तुम्हांला विचार कसला पडला आहे ?

विद्याधर – विचार करीत होतों की कुठं जायचं तर नाही ना ?

मन्दाकिनी – विद्याधर, खरं सांगा गेल्या एक दीड महिन्यांत आपण कुठं तरी बाहेर गेलों का ? प्रत्येक वेळीं तुमच्या अपॉइन्टमेन्टस् (appointments) आपल्या आहेतच. समाजसेवासंघाचे चिटणीस झाल्यापासून तर घरीं बायको आहे याची तुम्हांला आठवण राहीनाशी झाली आहे. तो मागचा चिटणीस एका बाईला घेऊन पळून गेला हें खरं का ?

विद्याधर – (त्रासून) ती बाईच त्याला घेऊन पळून गेली.

[टेलीफोनची घंटा वाजते. मंदाकिनी टेलीफोन घेत 'कोण– हं– आहेत– आहेत' असें म्हणते व त्रासून रिसीव्हर खाली ठेवते.]

विद्याधर – कुणाचा टेलिफोन आहे ?

मन्दाकिनी – सुहासिनीचा.

विद्याधर – अस्सं ! (टेलीफोनकडे वळतो. मन्दाकिनीच्या कपाळाला आठ्या पडतात.) हलो !– कोण ?– मी विद्याधर– काय ?– हं– हं– हं–आलं लक्षांत,– मी येणार होतोच– आज की उद्या एवढाच प्रश्न– आठच्या सुमारास मोकळा झालों तर येईन.– ह– मग जरा स्वस्थपणं बोलतां येईल.– ते पत्र पाहून पुढला विचार करायचा आहे ना ?– (मन्दाकिनीकडे वळून) कां ? आठ्या पडल्याशा ?

मन्दाकिनी – कां पडूं नयेत ? इकडे मी आपली मारे बाहेर जायच्या गोष्टी करीत आहे आणि तुम्ही एक अपॉइन्टमेन्ट (appoint. ment) घेऊन मोकळे ! आश्चर्य आहे !

विद्याधर – तुझं म्हणणं अगदी खरं आहे. पण मन्दा, मी तरी काय करूं ? मला कामचुकारपणा करतांच येत नाही !

मन्दाकिनी – कसलं काम आणि काय ! आहे झालं ! काय ती संस्था आणि काय तिचं काम ! अगदी अंगावर शहारे येतात ! चार-चौघांत कांहीं उत्सुकतेन बोलायला नको. मला कित्येकांनी विचारलं की तुला हे सारं खपतं कसं ? गप्प बसले नी काय !

विद्याधर – जाऊं द्या. हा वाद काय नेहमीचाच आहे.

मन्दाकिनी – मग काय आज आमच्याबरोबर बाहेर नाही यायचं ?

विद्याधर – संध्याकाळचा कार्यक्रम राहू दे. मी शक्य झाल्यास येतों म्हटलं ना सुहासिनीला ! मी रात्रीं परत आलों की चटदिशीं जेवण आटोपून जाऊं सिनेमाला !

मन्दाकिनी — तें कसचं होतंय म्हणा ! मग सुहासिनीलाच कळवा दोन दिवसांनी येतों म्हणून ! काय हरकत आहे ?

विद्याधर — हरकत कसली असणार ? तिच्या आईचं विल (will) जरा पाहायचं होतं. एकदा हें प्रकरण हातावेगळं झालं की सुटलों.

मन्दाकिनी — आजकाल सुहासिनीशिवाय तुमच्या डोक्यांत दुसरा विचारच दिसत नाही ! तुम्हांला तिच्याशीं एवढं बोलवतं तरी कसं ? हिच्यासारख्या मुली पाहिल्या की माझ्या अंगावर कांटा उभा राहतो. आणि हिचा तर फोन केल्याशिवाय एक दिवस देखील जात नाहीं. तिची ती मंजुळा मावशी तर निमित्त काढून आजकाल रोज येऊं लागली आहे. भिकाजीपंत तिच्या नादीं लागला नाही म्हणजे मिळविली ! (विद्याधर हसतो.) तुम्हांला हसूं कसलं येतं ?

विद्याधर — तुझ्या बोलण्याचं.

मन्दाकिनी — मला काय वेडबीड लागलं आहे ?

विद्याधर — नाही. लागण्याचा रंग दिसतो इतकंच !

मन्दाकिनी — विद्याधर, तुम्ही माझा असा अपमान करीत नव्हतां पूर्वी !

विद्याधर — हा का अपमान झाला ?

मन्दाकिनी — तुम्ही कधी बोलण्यांत माघार घेणार ? शक्यच नाही !

विद्याधर — (निष्काळजीपणें) सुहासिनीचा टेलिफोन तो काय आला आणि त्यामुळ तूं चिडलीस ती काय ! कांही परस्परसंबंध ?

मन्दाकिनी — कां चिडूं नये ? तिकडे जाण्यासाठी माझे प्लान्स सारे तुम्हीं खोडून काढलेत आणि चिडलें म्हणून मलाच दोष देतां ! इतकं रात्रंदिवस काय टेलिफोनवर बोलणं चालतं तें ?

का हो, टेलिफोनवर बोललं म्हणजे कानांत बोलल्यासारखं वाटत असेल नाही ?

विद्याधर – (ओरडून) मन्दा ! (थांबून) झाली तुझी पुन्हा सुरवात ? बरं, मी विचारतों सुहासिनीन टेलीफोन करूं नये तर काय करावं ? लहानसहान कामाकरिता धावत यावं हो ! तशी ती आली असती तर तूंच म्हणाली असतीस की टेलिफोन असतांना घडीं घडीं प्रत्यक्ष भेटण्याचं कारण काय ?

मन्दाकिनी – पण मी म्हणतें इतकं काम तें काय असतं हो ? घरचा मनुष्य देखील इतकी कटकट सहन करणार नाही. आणि हिला संकोच असा नाहीच. मी तिला कांही आजच ओळखत नाहीं !

विद्याधर – मन्दा, तूं तिला ओळखणं शक्य नाही.

मन्दाकिनी – कां ?

विद्याधर – स्त्रियांना स्त्रियांची ओळख पटूं नये असा ईश्वरी संकेतच आहे !

मन्दाकिनी – पण ही ओळख पुरुष पटवून देतात ना ! सुहासिनी आणि मी एका वर्गांत होतों ठाऊक आहे ? तिच्या आणि माझ्या डोळ्यांतील सारखेपणाशिवाय आमच्यांत कांहीहि सारखेपणा नव्हता.

विद्याधर – वा ! मग तर तूं तिला आपल्या बहिणीप्रमाण समजायला पाहिजे होतंस. दोन सख्ख्या भावंडांत तरी यापेक्षा अधिक साम्य कोणतं असतं ?

मन्दाकिनी – विद्याधर, मी वाटेल तें सहन करीन पण असलं बोलणं नाही सहन करणार ! सुहासिनी माझी बहीण ! कसं बोलवतं हें तुमच्यान ? (जरा थांबून) विद्याधर, सुहा-

सिनीला मी अधिक ओळखतें बरं ! आणि एक सांगूं का ? तिच्या हसतमुखाचा अर्थ मी अधिक जाणतें. अगदी गोड हसते नाही ती ?

विद्याधर — मीं तरी तिला अजून हसतांना पाहिलं नाही. पण तूं तर आता कमालच करूं लागली आहेस. प्रत्येक स्त्रीला आपल्या सौंदर्याविषयी अभिमान आणि दुसऱ्याच्या सौंदर्याबद्दल मत्सर वाटतो. एखाद्या स्त्रीला सौंदर्य आणि कुरूपता यांची वांटणी करण्यास सांगितली तर ती सौंदर्य स्वतःकरिता राखून ठेवून जगांतील इतर सर्व स्त्रियांना मात्र कुरूप करून टाकील. एखादी स्त्री हसतमुख असली तर हा काय तिचा दोष झाला ?

मन्दाकिनी — हसण्याहसण्यांत फरक असतो !

विद्याधर — आणि तो समजण्याइतका शहाणपणा मजजवळ नाही असं का !

मन्दाकिनी — तुम्ही भलतंसलतं बोलूं नका !

[भिकाजीपंत प्रवेश करतो.]

विद्याधर — काय भिकाजीपंत, कोर्टातली काय खबर ? मन्दा, भिकाजीपंत म्हणजे ट्रॅव्हलिंग गॅझिट (Travelling Gazette) आहे. भिकाजीपंत, तुम्ही एक न्यूज एजन्सी (News Agency) उघडा.

भिकाजीपंत — (हसतो.) साहेब, त्या जस्टिस फेअरप्ले (Justice Fairplay) च्या पुढ तो घटस्फोटाचा खटला होता ना ? त्याचा निकाल लागला. आपण निघाल्यानंतर बाररूममध्ये तीच चर्चा चालली होती.

विद्याधर — त्या केसमध्ये कांहीं अर्थ होता का ? मीं त्या ख्रिश्चन बाईला आधीच सांगितलं होतं म्हणूनं तर मीं ती केस घेतली

नाहीं. तिचं म्हणणं काय तर तिचा नवरा तिच्या धाकट्या वहिणीशीं तासनतास बोलतो व चार चौघांत तिच्याकडे पाहून हसतो देखील. यावरून काय सिद्ध होणार ?

भिकाजीपंत – आपण निकाल अगोदर दिलांत तरी लोकांचे डोळे निकालाकडे लागले होते. सूट डिसमिस होणार हें तर उघडच होतं. पण त्यान जजमेन्ट बहारीचं लिहिलं आहे म्हणतात.

विद्याधर – फेअरप्ले ( Fairplay ) मोठा हुशार आहे. अन् तसा गुंडहि आहे. बराच फाजिलपणा केला असेल त्यानं.

भिकाजीपंत – मला तरी काय दोनचार वाक्यंच आठवतात. मनुष्यान जरी अनेक जाती निर्माण केल्या असल्या तरी निसर्गाला स्त्री आणि पुरुष या दोनच जाती मान्य आहेत. धाकटी बहीण देखील स्त्रीच असते हें विसरूं नये. नवरा आपल्या ताब्यांत राहावा असें वाटणाऱ्या बायकांनी घरांत तरुण स्त्रियांना आश्रय देऊं नये. त्या सुंदर नसल्या तरी धोका असतो. त्या सुंदर असल्या तर हमखास धोका असतो हें लक्षांत ठेवावं. (मन्दाकिनी टवकारून पाहते. भिकाजीपंतहि तिच्याकडे साभिप्राय पाहतो.) आपला नवरा चांगला आहे असा कोणत्याहि स्त्रीन अभिमान बाळगूं नये. तो तसा चांगला असता तर तिलाच वश झाला नसता.

विद्याधर – पहिल्या नंबरचा पाजी आहे. लिहितांना लिहील वाटेल तें पण व्हरडिक्ट (verdict) चुकायचं नाहीं अं ! बाररूममध्ये आज हसण्याला ऊत आला असेल !

भिकाजीपंत – एक एक वाक्य उच्चारून हास्याचे फवारे उडत होते. (थांबून) आज सकाळीं म्हणालांत त्या केसच्या नकला आल्या आहेत. दिसते केस चमत्कारिक !

विद्याधर – सगळे कागद लावून ठेवा. पाहीन मी.

[जिवाजी चहा आणतो. विद्याधर आंत जातो.]

मन्दाकिनी – ही त्या ख्रिश्चन मास्तरणीची केस! (भिकाजी मान हलवतो.) मी तर ऐकत होतें तिला घटस्फोट मिळणार म्हणून!

भिकाजीपंत – कोणतीहि गोष्ट व्यवहारांत पटली म्हणून कायद्यांत सिद्ध होत नाही. कायद्याइतका मंद बुद्धीचा प्राणीच नाही जगांत! त्या बाईला जें सिद्ध करायचं होतं तें तिला सिद्धच करतां येईना. तिन कांही म्हटलं की तिचीच चेष्टा होऊं लागली! 'त्यांत काय झालं?' हा प्रश्न आपला तयारच. तिन सुरवात केली– माझा नवरा माझ्या बहिणीशीं बोलतो. त्यांत काय झालं? तिच्याकडे पाहून हसतो. त्यांत काय झालं? तिला घेऊन चांदण्यांत फिरायला जातो. त्यांत काय झालं? तिला घेऊन नाटकाला जातो. त्यांत काय झालं? त्यान करायचं कांहीच बाकी ठेवलं नव्हतं पण हिने पाहिलेल्या गोष्टीवरून न पाहिलेल्या गोष्टी कशा सिद्ध होणार? कायदा हा असा आहे! (हळूच) ताईसाहेब, साहेबांच्या वर्तनाची चर्चा बाररूममध्ये सुद्धा होऊं लागली आहे. या केसची चर्चा करतांना दहा वेळां त्यांचं नांव निघालं असेल.

मन्दाकिनी – खरं?

भिकाजीपंत – त्यांच्या संस्थेतील लोकच मुळी त्यांच्याकडे संशयित दृष्टीन पाहूं लागले आहेत. परवाच्या सभेंत तर त्यांनी स्पष्ट सांगितलं की मी सुहासिनीला घरीं ठेवण्यास तयार आहें म्हणून. त्यावरच रण माजलं होतं.

मन्दाकिनी – (भावनाचा आवेग दाबून) नशीब आपलं....भिकाजीपंत, जिवाजीला पाठवा नानासाहेबांच्याकडे बोलवायला.

[विद्याधर येतो. हातांतील नॅपकिन् पाठोपाठ येणाऱ्या जिवाजीला देतो व खुर्चीवर बसतो.]

**भिकाजीपंत** – पाठवतों अं ! [भिकाजीपंत जातो.]

**विद्याधर** – मन्दा, सुहासिनीचा प्रश्न मला इतका जिव्हाळ्याचा कां वाटतो सांगू ? तिच्या आईन मरतां मरतां तिचा सांभाळ करण्याचं माझ्याकडून वचन घेतलं होतं. पाठची बहीण म्हणून सांभाळ करा असं ती शपथ घालून म्हणाली. तुझ्या डोक्यांत जर कुलशीलाचं वेड नसतं तर मी तिला घरींच आणलं असतं.

**मन्दाकिनी** – घरीं आणण्याची गोष्टच नको. इतक्या आपलेपणान सुहासिनीकडे पाहण्याचं तुम्हांला कांही कारणच नाही. हीं पुस्तकंबिस्तकं तिच्याकडे पाठवणं देखील मला पसंत नाही. इतकी योग्यता आहे का तिची ? मी तिला चांगली ओळखतें बरं !

**विद्याधर** – (आश्चर्यानें) हं !

**मन्दाकिनी** – मीं न ओळखायला काय झालं ?

**विद्याधर** – (विचारमग्न होतो व एकदम) मन्दा.... मन्दा....मन्दा, हा निष्कारण मत्सर कशासाठी ? सुहासिनी एक निष्पाप बालिका आहे. आईबापांचीं पापं मुलांना भोवतात असं म्हणतात, तशीं तीं पापं तिला भोवूं नयेत अशी माझी इच्छा आहे. त्यासाठीच ही सारी खटपट !

**मन्दाकिनी** – विद्याधर, तुम्ही म्हणतां तें खरं पण मी तरी काय करूं ? मला कशाची तरी भीति वाटते !

**विद्याधर** – भीति ? तुझ्या हातून मी निसटेन हीच ना ? नवरा म्हणजे पिंजऱ्यांतील पक्षी ! कां ? असंच ना ? इतके दिवस स्त्रियांची गुलामगिरींतून सुटका करण्याचे प्रयत्न झाले; आतां पुरुषांची

गुलामगिरींतून सुटका करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत.

मन्दाकिनी — तुम्ही अशी चेष्टा करूं नका.

विद्याधर — मन्दा, एकच गोष्ट लक्षांत ठेव. प्रेमान प्रेम वाढतं. विश्वासान विश्वास वाढतो. प्रेमातिशयान का होईना, आपण त्रागा केला की मनुष्य जवळ येण्याऐवजी दूर जातो. माझं बोलणं समजण्याइतकी तूं शान्त झाली आहेस का ?

मन्दाकिनी — विद्याधर, बोला, बोला. तुम्ही बोलूं लागलांत म्हणजे सर्व संशय नाहीसे होतात.

विद्याधर — सुहासिनी ही एक वेश्येची मुलगी हें तूं जाणतेस ना ? तिच्या आईन वेश्यावृत्ति स्वीकारली ती कांही स्वेच्छेन नव्हे. स्त्रियांची असहायता व पुरुषांची स्वार्थी विलासी वृत्ति यांच्यामुळ हा वेश्यांचा वर्ग निर्माण होतो. आज सुहासिनी असहाय आहे व जग नेहमीप्रमाण स्वार्थी आहे. या वेळेला लोकापवादाला भिऊन आपण दूर उभीं राहिलों तर आपल्यांत आणि इतरांत फरक तो काय ?

मन्दाकिनी — विद्याधर, सुहासिनीला मदत करायला मी तयार आहें परंतु आपण तिची सोय कुठतरी दूर करूं म्हणजे झालं !

विद्याधर — मग ती सोय आपण कशाला करायला पाहिजे ? आपण तिचे स्नेही म्हणविणार आणि तिला दूर ठेवणार ? छान ! आपणच तिला अशा रीतीन दूर ठेवणार असलों तर समाजान तरी तिला कां जवळ करावं ?

मन्दाकिनी — तुमच्यापुढ कसं बोलावं हेंच कळत नाही ! पण मनाला कांही तुमचा बेत पटत नाही. विद्याधर, माझी वेडी समजूत म्हणून तिला घरीं आणण्याच्या गोष्टी बोलूं नका.

विद्याधर — वेडी समजूत म्हणजे काय ?

मन्दाकिनी — ज्याचं कारण देतां येत नाही अशी.

विद्याधर — मग तुझी वेडी समजूत नाही.

मन्दाकिनी — कां ?

विद्याधर — कारण देतां येतं म्हणून !

मन्दाकिनी — येतं ? काय कारण ?

विद्याधर — कारण ? अगदी उघड करून सांगूं ? वेडे पोरी, सुहासिनी आपल्या घरीं राहिली तर ती तुझ्या हक्काचं प्रेम आपल्याकडे ओढून घेईल अशी तुला भीति वाटते अं ! पण अशी तुला भीति कां वाटावी ?

मन्दाकिनी — पण विद्याधर....

विद्याधर — मन्दा, तुझ्या मनांत संशय आला खरा. चल आपण आज बरोबरच सुहासिनीकडे जाऊं.

मन्दाकिनी — मी येणार नाहीं.

विद्याधर — नाही ?

मन्दाकिनी — त्रिवार नाहीं ! पुन्हा असली गोष्ट काढूं नका !

[भिकाजीपंत येतो व व्हिजिटिंग कार्ड देतो.]

विद्याधर — (कार्ड पाहत) मन्दा, जरा आंत जाऊन सुहास्य मुद्रेन परत ये. तुझी अन् या गृहस्थांची ओळख करून देणार आहें. फार रसिक आहेत ! चल; भिकाजीपंत, पाठवून द्या त्यांना आंत.

[सुधीर प्रवेश करतो. विद्याधर उठून पुढे जातो व मोठ्या प्रेमाने त्याचा हात धरून त्याला खुर्चीवर बसवतो व त्याजकरिता चहा तयार करतो.]

सुधीर, तुम्ही इथ कसे ? मला वाटलं तुम्ही अजून काश्मीरच्या दऱ्याखोऱ्यांत संशोधन करीत असाल. किती आनंद झाला म्हणून सांगूं !

सुधीर – आणि तुमचा आनंद पाहून मला किती आश्चर्य वाटतं म्हणून सांगूं ! मी तर साधारणपणें एकदा भेटलेल्या माण-साची आपण होऊन पुन्हा भेट घेत नाहीं. मला आश्चर्य वाटतं तें हें की मी इकड आलों कसा, आणि त्यामुळच मला एकप्रकारची अस्पष्ट भीति वाटूं लागली आहे !

विद्याधर – (हसत) नो ड्रॅमॅटिक आयरनी प्लीज (No dramatic irony please) ! सुधीर, आपल्या भेटीचा पहिला प्रसंग चिरस्मरणीय खराच ! ती काश्मिरांतील चांदणी रात्र ! गुला-बाच्या सुवासान दरवळलेलं तें वातावरण आणि तुमचं मधुर गायन ! नुसती आठवण व्हायचा अवकाश की अंतःकरण उचंबळून येतं ! तुमच्या काव्याचा माझ्या मनावर इतका परिणाम झाला आहे की ते स्वर अजून माझ्या कानांत घुमत आहेत. आपल्याला शास्त्रीय संगीत समजत नाही परंतु तुमच्या भावगीतांनी तर वेड लावलं ! आज कामाची तर नुसती भाऊगर्दी उसळली आहे. तरी पण तुमच्या आव-डीचं एक गाणं ऐकल्याशिवाय कांही आपण बाहेर पडणार नाहीं. कामं काय, रोजचींच आहेत ! सुधीर, एक म्हणा हो !

सुधीर – पुष्कळ वर्षांपूर्वी रचलेलं एक अपशकुनी गाणं म्हणतों झालं.

कोणिकडे जादुगारिणि; आज सांग धावा ?
दडपित कां तरुण मनें चरण हा पडावा ?
आज खैर मज न दिसे बघुनि तुझ्या भावा,
ही गहिरी नजर जहर,
कवणावरि करिल कहर ?
तरुण कवण लक्षिसि जो चरणिं लोळवावा ?

(भा. रा. तांबे)

[मन्दाकिनी दरवाज्याजवळ उभी आहे असें दिसतें.]
[गाणें संपतांच प्रवेश करते.]

विद्याधर — सुधीर, ही माझी पत्नी मन्दा. मन्दा, हे माझे नूतन मित्र सुधीर. (मन्दा व सुधीर एकमेकांना पाहून चकित होतात.) मन्दा, मी गतवर्षी काश्मीरला गेलों होतों ना? तेव्हा यांची माझी प्रथम गांठ पडली.

मन्दाकिनी — (उदासीनतेने) आम्ही कांही अगदीच अपरिचित नाहीं.

[विद्याधर सुधीरकडे पाहतो. सुधीरचा चेहरा उतरतो.]

विद्याधर — (लक्षात आल्यासारखें) सुधीर — सुधीर— हें काय? मन्दा, तुम्ही अशीं स्तब्ध कां? सुधीर, आपली गांठ प्रथम पडली त्या वेळीं तुम्हीं थोडासा आपला पूर्वेतिहास मला सांगितला त्याच्याशीं तर मन्दाचा संबंध नाही ना? (सुधीर भयभीत होतो) आणि त्या वेळीं तुम्हीं कांही निरतिशय सुंदर प्रेमगीतं म्हणून दाखविलींत त्यांची नायिका मन्दा तर नाही ना? सुधीर, सांगा, सांगा. (थांबून उत्साहाने) हो म्हणा.

सुधीर — (चांचरत) हो....पण!

मन्दाकिनी — (संतापाने) सुधीर, एखाद्या कुलीन स्त्रीची अशी विटंबना कराल अशी माझी कल्पना नव्हती!

विद्याधर — मन्दा, तूं शुद्धीवर आहेस का? आपल्या घरीं आलेल्या पाहुण्याचा असा अपमान? आणि पाहुणा कसा तर ज्याने आपल्या काव्यांत तुला अजरामर केलं आहे असा! तुला त्यांचे आभार मानले पाहिजेत. (मन्दाकिनी संतापाने त्याच्याकडे पाहते.)

मन्दाकिनी — कसचे आभार? कुलीन स्त्रिया म्हणजे कांही सिनेमानटी नव्हेत की वाटेल त्या उपटसुंभान यावं आणि तोंड

भरून स्तुति करावी. [जाते.]

सुधीर – विद्याधर, माझी चूक झाली. मन्दाची गांठ इथ पडेल अशी मला कल्पना असती तर मीं इथ पाऊल टाकलं नसतं. अगदी अजाणतेपणान मी इथ आलों! विद्याधर, जातों मी.

विद्याधर – थांबा सुधीर....सुधीर (पुढे काय बोलावें हें सुचत नाही) ....सुधीर—

सुधीर – तुम्ही कां वाईट वाटून घेतां? हा अनुभव नेहमीचाच आहे! आणि आता मला मुळी कांहींच वाटत नाही! माझी वृत्तिच अशी बनली आहे की मला जिकडे तिकडे घोर निराशाच दिसून येते.

विद्याधर – सुधीर, या थोड्याशा जीवनक्रमांत तुम्हांला फार कटु अनुभव आले ना? आणि आज माझ्यामुळच तुमची चित्त-वृत्ति इतकी अस्वस्थ झाली!

सुधीर – चित्तवृत्ति अस्वस्थ व्हायला एकच एक कारण लागत नाही. रात्रीं आकाशांतील तारे डोळे भरून पाहत असतांना एखादा तारा तुटतांना दिसावा, प्रभातकाळीं उद्यानांत सहल करतांना वृक्ष-वेलीवरून निद्रावस्थेंत खाली गळून पडलेलीं फुलं कोणीं तरी तुडविलेलीं दिसावींत, अकल्पित थंडीन होरपळून गेलेल्या फुलपाखरांचं मरण पाहावं—विद्याधर, या विराटस्वरूप विश्वांत हीं प्रत्येक गोष्ट किती क्षुल्लक ठरेल! पण अशा प्रकारची क्षुल्लक गोष्टच मनुष्याच्या जीविताच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून द्यायला समर्थ होते.

विद्याधर – सुधीर, मला तुमच्याबद्दल अतिशय वाईट वाटतं. तुमच्या कोमल हृदयाचं कौतुक करूं का तुमच्या हळवेपणाबद्दल सहानुभूति प्रकट करूं!

सुधीर — विद्याधर, अगदी स्पष्ट बोलतों. मन्दा ही माझी बालमैत्रीण! तिच्यावर माझं निस्सीम प्रेम होतं ! तिचं माझ्यावर प्रेम होतं किंवा नाही याची मीं कधीच पर्वा केली नाही ! पण एका-एकीं या मैत्रीचे नाजूक धागेदोरे दुष्ट दैवान तोडून टाकिले !

विद्याधर — ते कसे ?

सुधीर — विद्याधर, तुम्हांला ब्राऊनिंगचं वाक्य आठवतं का ?

विद्याधर — कोणतं बरं ?

सुधीर — गॉड इज इन हिज हेवन, ऑल इज राइट वुइथ दि वर्ल्ड ! तुमचा कदाचित् यावर विश्वास असेल. पण हार्डी म्हणतो तेंच खरं ! गॉड इज नॉट इन हिज हेवन, ऑल इज रॉंग वुइथ दि वर्ल्ड ! मृत्यु हा दुःखाचं फार मोठं कारण आहे असं लोक मानतात. पण तें तसं नाही. त्यांत फक्त कायमच्या विरहाची भावना असते. मृत्यूपेक्षा जन्म हाच दुःखाचें आदि-कारण आहे ! मी कांही एखाद्या विरक्तासारखा बोलत नाहीं तर सुखान जिवंत राहायची इच्छा असून तसं राहतां येत नाही म्हणून बोलत आहें ! विद्याधर, मनुष्याच्या हातांत आई-बाप निवडण्याची शक्ति असती तर जीवित सुखमय झालं असतं. पण ती शक्ति नसल्यामुळ मनुष्याला दुःख सोसावं लागत आहे ! पाहा, जी गोष्ट मनष्याच्या हातात नाही ती-बद्दल प्रायश्चित ! अपराध न सांगतां शिक्षा ! हा काय न्याय झाला ?

विद्याधर — जगांत अशा गोष्टी चालतात म्हणून समंजस लोकांनी जगाला सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. पुढ ?

सुधीर — विद्याधर, आमची मैत्री तुटली त्याचं कारण माझं निष्कुलीनत्व. त्यांत माझ्या स्वाभिमानाला धक्का बसला हो ! पण माझं प्रेम

अजून कायम आहे. त्या प्रेमाचा आणि त्या व्यक्तीचा कांही संबंध नाही. फक्त ते डोळे आणि त्यांतील जादू ! बस ! यापलीकडे मला कांही नको !

विद्याधर — (कल्पना सुचल्याप्रमाणे) आणि समजा तुम्हांला तसेच दुसरे डोळे, तशीच जादू अन्यत्र सांपडली तर ?

सुधीर — तर धाव घेईन ! विद्याधर, प्रेम वैषयिक म्हणजे मुख्यत्वें शारीरिक असतं असं आधुनिक शास्त्रज्ञांचं म्हणणं आहे. ही एक जग चालविण्याची निसर्गाची क्लृप्ति आहे असं म्हणतात. पण विद्याधर, विश्वास ठेवा, मी फक्त त्या दिव्य जादूचा भुकेला आहें !

विद्याधर — मी तुमच्याकरिता ती दिव्य जादू मिळवूं शकलों तर मग तुमची जगाविषयीची वृत्ति थोडी तरी बदलेल ना ?

सुधीर — कां नाही बदलणार ? मनुष्याचा अनुभव म्हणजेच त्याची वृत्ति. विद्याधर, सध्याच्या मन:स्थितींत सुद्धा एखाद वेळेस जगांत जिकडे तिकडे प्रेम भरलेलं असावं असं वाटतं. जगांतील हें प्रेमाचं साम्राज्य पाहिलं म्हणजे पाहिल्या क्षणीं ऊर आनंदान भरून येतो व दुसऱ्या क्षणीं आपलं दुर्दैव एखाद्या पिशाच्चाप्रमाण आपल्यापुढ उभं राहतं !

विद्याधर — (सहानुभूतीने) सुधीर, तुमच्याशीं मला किती किती बोलायचं आहे ! पण तें नंतर ! चला, मी तुम्हांला एक आश्वासन देतों की मी तुमची आणि मन्दाची मैत्री पुन्हा करून देईन. आलोंच अं ! (विद्याधर आंत जातो व कोट घालीत परत येतो.) [भिकाजीपंत येतो.]

भिकाजीपंत — साहेब, त्या नव्या केसचे कांही महत्त्वाचे कागद आणले आहेत तेवढे पाहून....

विद्याधर – राहूं द्या हो ! पाहूं सकाळीं ! संध्याकाळीं कसलं आलं आहे कोर्टाचं काम ?

भिकाजीपंत – नेहमीपेक्षा केस निराळी आहे. ....

विद्याधर – असेना ! पण कायदे तेच आहे ना ! त्याकरिता आता कायदे निराळे करायचे काय ? कांही वेळ तर धंद्याचा विसर पडूं द्याल कीं नाही ?

[सुधीर आणि विद्याधर जातात. भिकाजीपंत त्यांच्याकडे पाहतो. मन्दाकिनी प्रवेश करते. जिवाजी येतो.]

मन्दाकिनी – जिवाजी, माझा निरोप पोचता केलास का ? काय म्हणाले नानासाहेब ? येणार आहेत का ?

जिवाजी – हो– नाय, नाय– हो वाढूळ करीत होते. पण शेवटीं हो म्हणाले तेव्हां वाटतं येतील म्हून !

मन्दाकिनी – बरं, मी वर जातें. नानासाहेब आलेच तर मला खाली हाक मार. इतर कोणी आलं तर सांग, काय वाटेल तें सांगून त्यांना वाटेला लाव. मी आज कुणालाहि भेटणार नाहीं. (जिवाजी तिच्याकडे पाहतो. जरा चिडून) असा काय माझ्याकडे वेंधळ्यासारखा पाहतोस ? भिकाजीपंत, तुम्ही इथंच आहांत ना ? लक्षांत ठेवा मीं सांगितलेलं !

भिकाजीपंत – जिवाजी, त्या खुर्च्या नीट लावून ठेव आणि हे वर्तमानपत्रांचे भारे जाऊं देत आंत. (मन्दाकिनी आंत जाते. जिवाजी सर्व सामान व्यवस्थित करतो व चहाचीं भांडीं घेऊन जातो. मंजुळा येते. जिवाजी मिस्किलपणें हसत आंत जातो.)

जिवाजी – ह्यो म्हातारपनचीं थ्येरं लई जड जात्याल पघा– लई जड जात्याल !

मंजुळा – भिकाजीपंत, बरं तुम्हीच भेटलांत. ताईसाहेब तर इथ

नाहीत ना ?

भिकाजीपंत — (वर गेल्या आहेत अशा अर्थाची खूण करतो.) मंजुळा मावशी, तूं तर शाळेंत जाणाऱ्या मुलीसारखी दिसतेस! काय हीं पुस्तकं! नुसतीं ओझीं वाहून तूं शहाणी व्हायचीस! काय ग, सुहासिनी इतकीं पुस्तकं वाचते ?

मंजुळा — वाचते तेव्हा वाचते, नाही तेव्हा ही अशी हात न लावतां परत करते. मीं तर तिच्यापुढ हात टेकले! या शिकलेल्या मुलींचे विचार तर आपल्याला कळतच नाहीत!

भिकाजीपंत — कां ?

मंजुळा — काय मोठमोठ्या गोष्टी बोलतात! विद्याधरसाहेब येऊं लागल्यापासून तर सुहासिनीचं डोकंच फिरून गेलं आहे! किती बोलतात दोघंहि कांही सुमार! आता तुम्हीच सांगा हिचं वय काय आता नुसतं बोलत बसायचं आहे का ?

भिकाजीपंत — पसरील हळू हळू आपलं जाळं!

मंजुळा — एवढी अक्कल असती तर काय पाहिजे होतं? तिला आताशा वाटू लागलं आहे की आपला कुलाचार सोडून पांढरपेशा वर्गाप्रमाण वागावं.

भिकाजीपंत — ही साहेबांची शिकवणूक असेल!

मंजुळा — पण प्रत्येकाचा कांही कुलाचार-जातिधर्म असतोच कीं नाही! आम्हीं जर आमचा धंदा सोडला तर तो करणार कोण ? का गरती स्त्रिया पुढ येणार आहेत ? (थांबते. आठवल्यासारखें करून) भिकाजीपंत, पांढरपेशांच्या मुलींनाहि म्हणे गंमत करावीशी वाटूं लागली आहे!

भिकाजीपंत — छे, छे! असं कसं होईल ? कांही नवान सुधारणा करण्याचा प्रयत्न....

मंजुळा – कसल्या सुधारणा घेऊन बसलांत ? हा आमच्या पोटावर पाय आहे दुसरं काय ? एक म्हणे लग्नाशिवाय राहिली तर दुसरी लग्न करून सोडून गेली. तुमच्याच पोरी जर असं करूं लागल्या तर मग आम्ही काय करायचं ?

भिकाजीपंत – तुझ्या जिभेला हाड आहे का ?

मंजुळा – आणि असं पाहा, पांढरपेशावर्गांतले पुरुषहि आता पहिल्यासारखे राहिले नाहीत. विद्याधरसाहेबच पाहा ना. इतके दिवस आमच्याकडे येतात पण कांही पाणी दिसत नाही.

भिकाजीपंत – तुझ्याकडे पहात नाहींत वाटतं ?

मंजुळा – आता काय राहिलं पाहण्याजोगं ? पण सुहासिनीकडे तरी ? छे ! नाहीच – नुसतं बोलणं ! मला तर कांही कळतच नाही. काय मोठमोठे शब्द वापरतात ! देशोद्धार, पतितोद्धार, सुधारणा, कुटुंबसंस्था. एक नवीन सांगू का ? अलीकडे म्हणूं लागले आहेत की सुहासिनीला घरींच नेऊं. मला नाहीं हा विचार पसंत ! लग्नाच्या बायका पिसाळल्या म्हणजे पिसाळलेलं कुत्रं बरं म्हणण्याची पाळी येते ! सुहासिनी या ठिकाणीं आली तर तिचे वाभाडे निघतील ! मी नाहीं तिला इकडे येऊं देणार !

भिकाजीपंत – साहेबांचा हेतु नुसता मदत करण्याचाच आहे.

मंजुळा – तिला कशाला मदत पाहिजे ? सौंदर्य अन् तारुण्य हीं शस्त्रं अशीं आहेत की वाटेल तो लोळण घेईल ! सुहासिनी वेडी आहे. मोहन आपली संपत्ति पायावर ओतायला तयार आहे तर तिकडे पाहत नाही आणि हे नुसती बडबड करताहेत तर यांच्या पाठीमागे लागली आहे.

[मोहन प्रवेश करतो.]

मोहनराव – अरे वा ! भिकाजीपंत, तुम भी मजा कर रहे हो ! वा, या पिकल्या पानांत बराच हिरवेपणा आहे की !

भिकाजीपंत – मोहनराव, काय बोलतां ? मी तुमच्या बापासारखा....

मोहनराव – आणि या कोण ? आमच्या मातुःश्री वाटतं ! काय गोष्टी सांगतां ? मंजुळामावशी, तुम्हीं कुळ तर चांगलं गांठलं !

भिकाजीपंत – गप्प बसायला काय घ्याल ? आपण कांही रस्त्यावर उभे नाही ! मंजुळा, तूं जा.

मोहनराव – कां ? कशाला आली होती ? तुम्हांला भेटायला का तुमच्या मालकाला ?

भिकाजीपंत – ती आली होती बिचारी हीं पुस्तकं परत करायला.

मोहन – बिचारी ! गळा दाटून आला की भिकाजीपंत. पाणी मुरतंय हं ! लक्षांत ठेवा ! हें प्रौढ स्त्रियांचं प्रेम अस्वलाच्या गुदगुल्यां-प्रमाण असतं. आता बरं वाटतंय, मग जीव घाबरा करील नुसता ! मंजुळामावशी, विद्याधर सुहासिनीला पंडिता बन-विणार की काय ? का सुहासिनीच त्याला बनवते आहे ?

मंजुळा – देव जाणे !

मोहनराव – मग तूं कशाला तिथ दारावर बसलेली असतेस ? विद्याधर आला म्हणजे मधून मधून कानोसा घेत जा की ! म्हणे देव जाणे ! नुसती नांवाची जरी असलीस तरी सुहासिनीची मावशी आहेस हें विसरूं नकोस.

मंजुळा – अहो मोहनराव, बांधलेली शिदोरी आणि मानलेलीं नातीं किती कामीं येणार ? बरं भिकाजीपंत, तीं पुस्तकं नीट ठेवा हं. मी जातें.

[मंजुळा जाते.]

मोहनराव – भिकाजीपंत, आमच्या बहिणाबाई काय करिताहेत ?

भिकाजीपंत – कोण ?

मोहनराव – आमच्या मानलेल्या बहिणाबाई ?

भिकाजीपंत – बसल्या आहेत आपल्या दुर्दैवाचं ध्यान करीत. आज त्या कुणाला भेटणार नाहीत. फक्त नानासाहेब........

मोहनराव – मला तरी काय बोलायचं आहे म्हणा ! बहिणभावांचं प्रेम असतं लहानपणीं आणि मोठेपणीं फक्त भाऊबीजेच्या ओवाळणीपुरतं. दुरून दिसणाऱ्या एखाद्या सुंदर मुलीकडे डोळे भरून पाहात राहावं व जवळ येतांच ती एखादी आते-मामे बहीण निघावी म्हणजे पाहणाराचा चेहरा कसा होतो आहे माहीत ? बहिणीच्या भेटीचा आनंद नाही होत त्या वेळीं ! बहिणीशीं बोलण्यापेक्षां एखाद्या फक्कड मैत्रिणीशीं बोलण्यांत जास्त मौज वाटते ! नानासाहेब इतक्यांत येतील ना ?

भिकाजीपंत – हो.

मोहनराव – मग थांबतोंच झालं. बसूं का तुमच्या ऑफिसांत ?

भिकाजीपंत – कुठहि ! घर तुमचंच आहे !

[मोहन व भिकाजीपंत ऑफिसांत जातात. नानासाहेब प्रवेश करतात. भिकाजीपंत ऑफिसांतून बाहेर येतात.]

नानासाहेब – घरांत कोण कोण आहे ?

भिकाजीपंत – साहेब बाहेर गेलेत; ताईसाहेब वर आहेत.

नानासाहेब – मन्दाला सांग मी आलों म्हणून. [मन्दाकिनी जिन्याच्या पायऱ्यांवर दिसते.]

मन्दाकिनी – (चिडून) आज मंडळी तरी किती येऊन गेली ? सारखा बोलण्याचा आवाज ऐकूं येत होता. ही काय धर्मशाळा आहे ? (भिकाजी स्तब्ध राहतो व जातो.) (नानासाहेबांना उद्देशून) केव्हा आलांत ?

नानासाहेब — मी बसायला आणि तूं खाली यायला एकच गांठ पडली. आज तूं अशी खिन्न कां ? आणि तुझं तोंड आज इतकं कशानं उतरलं ? आज तुझी प्रकृति बरी नाही का ?

मन्दाकिनी — प्रकृति चांगली आहे पण मन अत्यंत उदास आणि अस्वस्थ झालं आहे. म्हणूनच मी तुम्हांला बोलावणं पाठवलं. नानासाहेब, माझं लग्न होऊन दोन-अडीच वर्षे झालीं पण मन अस्वस्थ असलं म्हणजे तुमच्या भेटीशिवाय तें नाही ताळ्यावर येत !

नानासाहेब — माझंहि पण तसंच आहे ! या वृद्धापकाळांत संसारापासून अलिप्त राहून हरिभजनांत काळ घालवायचा माझा निश्चय जवळ जवळ यशस्वी झाला आहे. परंतु तुझ्याविषयी वाटणारं प्रेम मात्र पुन: पुन: मला संसाराकडे साभिलाषदृष्टीनं पाहायला लावतं. अपत्यस्नेह मोठमोठ्यांना झुगारून देतां आला नाही; मग माझी काय कथा ? मन्दा, तुझी आठवण आली म्हणजे मी काय करीत असेन असं तुला वाटतं ? शाकुंतल वाचतों. कण्व मुनि आणि शकुंतला यांच्या विरहाचा प्रसंग अनुभवतों, धोतरानं डोळे टिपतों आणि आपल्या व्यवसायांत मन गुंतवितों. मन्दा, तुला आश्चर्य वाटेल. परंतु सांगतोंच. या वृद्धापकाळांत जर मला एखाद्या गोष्टीमुळ सुख होत असेल तर ती गोष्ट म्हणजे माझ्या मन्दाचा संसार सुखानं चालला आहे ही होय. (मन्दा दचकून पाहते. तिचे डोळे पाण्यानं भरून येतात.) कां बेटा, अशी कां दचकलीस ? आणि तुझ्या डोळ्यांत पाणी ? मन्दा आज कांही तरी कमी जास्त झालं आहे खास. विद्याधरशीं भांडलीस तर नाहीं ना ? (मन्दाकिनी स्फुंदूं लागते. नानासाहेब तिच्या-

जवळ जातात व तिला कुरवाळतात. तिला अधिकच उमाळा येतो.) मन्दा, बाळ, काय झालं बरं? मला नाही का सांगायचं?

मन्दाकिनी — नानासाहेब, तुम्ही आता काय म्हणालांत! माझा संसार सुखान चालला आहे या कल्पनेन तुम्ही सुखी आहांत? मग.... मग....

नानासाहेब — मग-मग-काय! मन्दा, आज तूं शुद्धीवर आहेस ना? असं काय करतेस? आज काय झालं?

मन्दाकिनी — नानासाहेब, तुम्हीं एका मित्राच्या कन्येला लहानाचं मोठं केलं तें म्हातारपणांत तुम्हांला दुःख द्यायला का हो? माझं सुख तें तुमचं सुख असंच ना? मग मी माझं सुख गमावून बसलें असं तुम्हांला कळलं तर!

[पुनः डोळे पाण्याने भरून येतात.]

नानसाहेब — मन्दा, तूं काय म्हणतेस माझ्या नाही लक्षांत येत! मन्दा, बोल! (टक लावून पाहतात.) बोल!

मन्दाकिनी — नानासाहेब, होऊं नये तें झाल! सारीं सुखस्वप्नं फोल ठरलीं! सुधारणेच्या कल्पना अंगाशीं आल्या! मनुष्यजातीवरचा विश्वास पार उडाला!

नानासाहेब — इतकं अगदी वैतागायला काय झालं? तुझा कांही तरी गैरसमज झालेला दिसतो. एरव्ही जगासंबंधी इतकी उदासीनता येण्याचं कारण काय? मन्दा, तुझं आणि विद्याधराचं भांडण झालं ना! हो. तेंच कारण असलं पाहिजे या उद्विग्नतेच्या मुळाशीं! एकदा मला सगळं ऐकूं दे. एक सांगूं का की आपण आपलीं दुःखं अनेक वेळां कल्पनेन निर्माण करीत असतों. खऱ्या भुतांपेक्षा हीं कल्पनेचींच भुतं

आपल्याला अधिक भेडसावीत असतात !

मन्दाकिनी — खरं आणि खोटं न कळण्याइतकी का मी अज्ञानी आहें ? नानासाहेब, मन्दाच्या सुखाच्या तुमच्या कल्पना साऱ्या फोल ठरल्या ! तुम्हांला दुःख होईल; पण काय करूं ? कुणाला सांगूं ? जिवाभावाचं असं तुमच्याशिवाय कुणी आहे का ? नानासाहेब, माझे विद्याधर मला पारखे झाले; पाहतां पाहतां दूर झाले. नानासाहेब, इतकी कशी मी अभागी !

[नानासाहेबांच्या खांद्यावर डोकें ठेवून अश्रू ढाळते.]

नानासाहेब — मन्दा, शान्त हो, शांत हो. मला सर्व सांग. संकट खरंच आलं असलं तर त्यांतून मार्ग काढतां येईल. संकटाला धैर्यानं तोंड दिलं पाहिजे. आयुष्याचा सत्यानाश व्हायला आयुष्य शेणामेणाचं थोडंच बनलेलं आहे ? सांग, बेटा सांग काय झालं तें !

मन्दाकिनी — काय सांगूं ? जीवित उद्यानाप्रमाण रमणीय वाटत होतं हो ! पण तिथं हा एकदम वणवा कसा पेटला ! नानासाहेब, विद्याधर चंचल बुद्धीचे असतील असं तुम्हांला कधी तरी वाटलं का ?

नानासाहेब — कधीं वाटलं नाहीं आणि अजूनहि वाटत नाही. विद्याधर अतिशय गुणी आहे. तुझ्या बोलण्यावरून या साऱ्या दुःखाच्या मुळाशीं एखाद्या स्त्रीचा संबंध येतोसा दिसतो. खरं ना ?

मन्दाकिनी — त्या कवटाळणीची आठवण देखील नको.

नानासाहेब — कां तिला शिव्या देतेस. त्या स्त्रीचा दोष असला तरी विद्याधराचा पण तितकाच नाही का ? मन्दा, तुझ्याच तोंडून मला एकदा सर्व हकीकत ऐकूं दे.

[मोहन प्रवेश करतो.]

मोहनराव — नानासाहेब, मी आल्यानं व्यत्यय तर नाही ना आला ?

नानासाहेब — (कडकपणें) कोण मोहन ? (मन शांत करून) भलत्या वेळेस आलास. जरा मन्दाची समजूत घालीत होतों.

मोहनराव — आता समजूत घालण्याचे प्रसंग असेच वारंवार येतील ! नानासाहेब, माझ्याकडे असं टक लावून काय पाहतां. जगांत इतके चमत्कार भरलेले असतील असं मला कोणीं काल सांगितलं असतं तर त्यावर मीं विश्वास ठेवला नसता पण आज— आज मी वाटेल त्या गोष्टीवर विश्वास ठेवायला तयार आहें. नानासाहेब, आज मला इथ पाहून तुम्हाला आश्चर्य वाटलं असेल पण मी तुम्हांला निराळ्या रीतीनं आश्चर्य-चकित करण्यासाठी आलों आहें.

नानासाहेब — मग उशीर का ?

मोहनराव — हा हेटाळणीचा स्वर शेवटपर्यंत टिकला म्हणजे पुरे. मागच्या आठवड्यांतील गोष्ट. तुम्ही मला एक व्याख्यान दिलंत आणि विद्याधराचं अनुकरण कर म्हणून सांगितलंत. आठवतं का ?

नानासाहेब — त्याचं आज काय ?

मोहनराव — आज मला इतकंच सांगायचं आहे कीं विद्याधरच माझं अनुकरण करूं लागला आहे. सुंदर स्त्रियांच्या आसपास आपण असावं असं मला वाटतं तर सुंदर स्त्रिया आपल्या आसपास असाव्या असं त्याला वाटूं लागलं आहे ! तो आपल्या घराचं गोकुळ करणार आहे !

नानासाहेब — (त्रस्त मुद्रेनें) माझ्या कांहींसुद्धा लक्षांत येत नाहीं.

मोहनराव — मी सांगतों. नानासाहेब, तुम्हांला दुःख होईल पण

त्याला माझा नाइलाज आहे. मागच्या आठवड्यांतील तो प्रसंग घडला नसता तर आजची बातमी सांगतांना कदाचित् मलाहि इतका उत्साह वाटला नसता. काय मुक्ताफळं बाहेर पडलीं त्या वेळीं तोंडांतून. मला स्त्री म्हणजे उपभोग्य वस्तु वाटते— छे— भलतंच वाटलं मला कांही तरी. याला मात्र ती परमपूज्य वाटते आणि म्हणूनच—

नानासाहेब — तुला जें कांही सांगायचं असेल तें थोडक्यांत सांग.

मोहनराव — अगदी थोडक्यांत सांगतों. जी गोष्ट सांगण्यासाठी म्हणून मी इथ आलों ती सांगितल्याशिवाय मी परत कसा जाईन? नानासाहेब, मन्दाला एखादी सवत मिळाली तर ती गोष्ट तुम्हांला कितीशी रुचेल? यांत देखील त्याचा उदात्त हेतु आहे. मन्दा बिचारी घरीं एकटी असते. तिलाहि सोबत होईल, त्याचंहि काम होईल. खाणावळींत देखील आठवड्याला चेंज असते, मग संसारांत कां नको? म्हणून म्हणतों की मन्दाची समजूत घालण्याचे प्रसंग यापुढ वारंवार असेच येणार आहेत.

नानासाहेब — ही गोष्ट खरी कशावरून?

मोहनराव — मन्दाला विचारून खात्री करून ध्या.

नानासाहेब — मन्दा—

मन्दाकिनी — नानासाहेब! (गहिवरते व बोलूं शकत नाही.)

मोहनराव — नानासाहेब, ती या प्रसंगीं काय बोलणार? मला पुनः गेल्या आठवड्यांतील प्रसंगाची आठवण दिली पाहिजे. एका निर्दोष मुलीच्या असहायतेचा फायदा घेऊन मी तिच्या जन्माचं मातेरं करणार आहें असा आरोप विद्याधरान मजवर केलेला आपणांस आठवत असल. त्याच वेळीं मला संशय आला होता. वाटलं

या महात्म्याला इतका कळवळा येण्याचं कारण काय! बाकी स्त्रियांचा कळवळा येत नाही कोणाला? भिकाऱ्याला चार शिव्या देणारेच भिकारणीचं फाटक वस्त्र पाहून तिच्या पदरांत पैसा टाकतात आणि त्यांतून ती सुंदर असेल तर....

नानासाहेब — (ओरडून) मोहन!

मोहनराव — जाऊं द्या! नानासाहेब, सुहासिनीला विद्याधर आता घरीं आणणार आहे.

नानासाहेब — नाही, ही गोष्ट शक्य नाही!

मोहनराव — कोणती गोष्ट? घरीं आणणार ही? मन्दा, तूंच सांग म्हणजे तरी त्यांची खात्री पटेल. (नानासाहेब मन्दाकडे पाहतात.)

मन्दाकिनी — नानासाहेब, माझ्या दुर्दैवान ही गोष्ट खरी असण्याचा संभव आज तरी दिसतो आहे.

नानासाहेब — एक एक ऐकावं तें थोडंच आहे! मन्दा, हा संशयाचा तर खेळ नाही ना?

मोहनराव — कां उगीच आशेला आधार शोधतां?

नानासाहेब — सारा संसारच आशेवर उभा आहे. बरं असो. माझ्या कानांवर ही गोष्ट आली हें चांगलंच झालं. पाहतों मला कांही करतां आलं तर! मोहन, तूं जा. कांही कमीजास्त झालं तर मला अवश्य कळव.

मोहनराव — आणखी कमीजास्त तें काय होणार? गावांत बोंबाबोंब तर अगोदरच झाली आहे. आता मन्दाच्या संसाराची होळी विधिपूर्वक पेटवायची आहे. सुहासिनी आली कीं ठिणगी पडलीच.

(मोहन जातो.)

नानासाहेब — मन्दा, विद्याधर या वेळेस क्लबांत गेला असेल ना?

मन्दाकिनी – बहुतेक. शिवाय आज बरींच कामं आहेत असं म्हणत होते आणि आठ वाजतां जमल्यास तिकडे जाणार आहेत.

नानासाहेब – अस्सं ?

मन्दाकिनी – हं !

नानासाहेब – (विचार करून) मन्दा तुझा संशय खोटा आहे हेंच शेवटीं ठरलं तर ठीक आहे. नाहीं तर एकदम किती आयुष्यांचा नाश होणार आहे पाहा. माझ्या आयुष्याची यशापयशता तुम्हां दोघांच्या आयुष्यांवर अवलंबून आहे. मन्दा, मीं आयुष्यांत दोनच चांगल्या गोष्टी केल्या. एक तुला शिक्षण देऊन सुविद्य केलं व समाजसेवेला अखंड वाहून घेणारा विद्याधरासारखा शिष्य निर्माण केला. समाजसेवेसंबंधान सदिच्छा बाळगण्यापलीकडे माझ्या हातून कांहीच झालं नाही. परंतु तरी देखील मीं माझं आयुष्य अगदीच फुकट घालविलं नाही असं तुमच्याकडे पाहून मला वाटत असे आणि आता ही गोष्ट खरी असेल तर– काय दुर्दैव– माझं–तुझं–विद्याधराचं ! (थोडा वेळ थांबतात–विचार करतात) मन्दा, मला विद्याधर केव्हा भेटेल ?

मन्दाकिनी – त्यांना क्षणाची तरी फुरसद आहे का ? पण उद्यां तर रविवार आहे.

नानासाहेब – मग असं करतों, उद्या मला भेट म्हणून त्याला चिठ्ठी पाठवतों म्हणजे झालं ! त्याला केव्हा भेटेन असं मला झालं आहे ! मन्दा, मी जाऊं का ? तुला असं खिन्न पाहून येथून पाय निघत नाही. तूं येतेस का माझ्याबरोबर ?

मन्दाकिनी – नानासाहेब, तुम्ही मला भेटलांत, आता मी शांत होईन.

नानासाहेब – तूं हसल्याशिवाय आपल्याला कांही बरं वाटणार नाही !

मन्दाकिनी – मी आता लहान आहे का अगदी हास म्हटल्याबरोबर हसायला ?

नानासाहेब – मी तुला अशा स्थितींत सोडून गेलों तर पुनः भेट होईपर्यंत मी काळजींत राहीन.

मन्दाकिनी – (हसत) मी करूं तरी काय म्हणजे तुम्हांला बरं वाटेल ? लहान मुलाप्रमाणे इकडे तिकडे धावूं का वेड्याप्रमाणे नाचूं का गाणं म्हणूं ? मीं गाणं म्हणून तुम्हांला बरं वाटणार असेल तर म्हणतें. मला माहीत आहे तुम्ही पुष्कळ वेळां नुसतं माझं गाणं ऐकण्यासाठी येतां.

[नानासाहेब कौतुकाने तिच्याकडे पाहतात व ती गाणें म्हणते.]

राग – खम्बावती

मी चालतां वाट, या येइं दारास,
घोटाळुनी पाय लागें स्व मार्गास. ध्रु.
पुरला निधी काय माझा कुठे येथ ?
हरपे इथे रत्न आधार जीवास ?
ज्या जन्मजन्मांत शोधीं कुठे येथ
चिन्तामणी काय लोपे जवळपास ?
सन्दिग्ध मनिं लीन पूर्वस्मृती काय
जागूनि या ठायिं पिळतात हृदयास ?
जळल्या इथे काय आशा कधीकाळिं
ज्यांच्या मुळांतून नव पालवे आस ?
कां सन्निधीं गूढ सळसळ इथे होइ ?
किंवा फुटे वाट माझ्या भविष्यास ?
कां पापण्या येथ भिजती न कळतांहि ?
पोटांतुनी खोल कां येइ निश्वास ?

**कां हें असें होइ ? कां कालवे जीव ?**
**तें कोण या ठायिं ज्याची धरूं कास ?**

(भा. रा. तांबे)

नानासाहेब – काय पण गाणं शोधून काढलंस! अशा गाण्यान काय मन प्रसन्न होत असतं ? तुम्हां मुलींना आपलं दुःख थापटून थोपटून वाढविण्याची सवयच असते ! आता अगदी काळजी करू नकोस. जरा धीरान वाग.

**अंक पहिला समाप्त**



# २

[सुहासिनीचें घर– दिवाणखाना. रविवार दुपार. तीन साडेतीनचा सुमार. दिवाणखाना श्रीमंती व विलासी वृत्ति दर्शविणारा असा आहे. भिंतीशीं टेबलावर टेलिफोन. जुन्या पद्धतीचा कोच, खुर्च्या वगैरे व्यवस्थित मांडलेलीं दिसतात. भिंतीवर चित्रें. एका कोपऱ्यात बाजाची भारी किंमतीची पेटी. दोनचार ठिकाणीं पितळी फ्लॉवर पॉट्स्, लहानशा टेबलावर पत्त्यांचा जोड. मंजुळा कामांत असून तोंडानें गाणें गुणगुणत आहे असा देखावा.]

मंजुळा – राग काफी

"तुला न देइन माला,
जा जा चाल घराला० ध्रु.
मोठा भोळा, घालिशि डोळा, हाणि न हा पाचोळा.
काय गिऱ्हाइक बाइ फुलांचा?" "पूस तुझ्या डोळ्यांला!" १
हा फुललेला गुलाब-बेला! तुला न देइन झेला.
कसा गिऱ्हाइक बाइ! "पूस त्या गालांला, दातांला!" २
"तुला न देई मोहरेलाही! दुज्यास परि पैशाला!
कसा गिऱ्हाइक बाइ फुलांचा!" "पूस तुझ्या जीवाला!" ३
"फुलें पाहशी, सौदा करिशी, घेशिल बघ कांट्याला!"
"रुतुं दे कांटे चलाख माळिणि, खुपुं दे ग कलिज्याला!" ४
(भा. रा. तांबे)

[मंजुळा फोटोच्या काचेंत पाहून पदर ठीकठाक करते. मोहन प्रवेश करतो.]

मोहनराव – काय नखरा! मंजुळामावशी, या वयांत हा नखरा? मग एके काळीं तर तूं आग लावली असशील आग!

मंजुळा — कोण मोहनराव? किती पण घाबरलें मी!

मोहनराव — तूं आणि घाबरणार? एखाद्या नववधूचं काय अवसान आणतेस! जरा तरी अंगीं पोक्तपणा धरशील की नाही?

मंजुळा — मोहनराव मला दहा शिव्या द्या, पण पोक्त म्हणूं नका. जखमेवर मीठ कशाला चोळतां? का हो, विलायतेत बायका म्हणे पोक्त होतच नाहीत!

मोहनराव — खरंच. नाही होत!

मंजुळा — खरंच?

मोहनराव — अगदी खरं! विलायतेतील म्हाताऱ्या आपल्या तरुणींना लाजवतील इतकं तारुण्य त्यांच्या अंगात मुसमुसत असतं.

मंजुळा — तें कसं?

मोहनराव — म्हातारपणाला त्या ड्रेसिंग रूमच्या बाहेर डोकावूंच देत नाहीत आणि इतरांना ड्रेसिग रूममध्ये डोकावूं देत नाहीत. ड्रेसिग टेबलवर जरी दांत विराजमान होत असले तरी बाहेर लोकांना वाटतं की दुधाचेच दांत अजून कायम आहेत!

मंजुळा — जगाला फसवलं तरी नवऱ्याला तर कळेलच की नाही?

मोहनराव — जगाला एक वेळ कळेल पण नवऱ्याला पत्ता देखील लागूं देणार नाहीत. बायकोच्या ड्रेसिग रूममध्ये जाण्याचा उद्धटपणा जर नवऱ्यान केला तर बायकोची अब्रू घेणारा म्हणून त्याची बेअब्रू व्हायची! विनयभंगाची फिर्याद करून बायको तावडतोब घटस्फोट मागायची! बरं, ते जाऊं दे. का ग, सुहासिनी आजकाल काय माळ जपत असते? आहे का घरांत?

मंजुळा — गेलीय बाहेर बाजारांत.

मोहनराव — एकटीच गेली असेल. तिच्या कल्पनेप्रमाण जरी तिचं

लग्न झालं तरी ती बहुतेक नैष्ठिक ब्रह्मचर्यच पाळील.

मंजुळा – या पोरीपुढ तर आपण हात टेकले.

मोहनराव – तूं नाही का तिला चार उपदेशाच्या गोष्टी सांगूं शकत?

मंजुळा – खूप सांगेन पण तिन ऐकलं पाहिजे ना. हे सुधारकी चाळे आपल्याला नाही पटत. विद्याधरसाहेबांनी तिच्या डोक्यांत काय भरवलं आहे देव जाणे! तिला वाटतं आपला जन्म पतित कुळांत झाला आहे– आपल्याला समाजांत मान नाही–

मोहनराव – साफ खोटं आहे हें. कुरूप मुलींना संसार थाटतां यावा म्हणून हा कुलशीलाचा बडजाव वाढवण्यांत आला आहे हें नाही तिला कळत? रूपाची उणीव त्या शीलान भरून काढतात. सुहासिनीकडे पाहिलं म्हणजे तिच्या कुलाचा विचार मनांत येण्याइतका कोण अरसिक असेल आणि मानासंबंधी म्हणशील तर तोहि लग्नाच्या बायकोच्या पदरांत पडत नाही. तिच्या पदरांत नुसतीं पोरं पडतात. तसं असतं तर लेकुरवाळ्या बायकांकडे आदरान पाहत रस्त्यांत थवेच्या थवे उभे राहिले असते. लग्नाच्या बायकोला मानसन्मानान वागविण्याचं पाप या भारतवर्षांत तरी आजपर्यंत कोणीं केलं नाही.

मंजुळा – तिच्या कुळाला आजपर्यंत लग्नाचा डाग लागला नाही. तिला आता वाटतं की विवाह करून सुखाचा संसार–

मोहनराव – तीहि सोय आहे. कर म्हणाव गांधर्वविवाह!

मंजुळा – हा गांधर्वविवाह कसा असतो?

मोहनराव – ही विवाहाची फार प्राचीन पद्धत आहे. वैदिक विवाह-पद्धति निर्माण होण्यापूर्वी ही मानवजात कायम ठेवण्याचं पुण्य याच पद्धतीला मिळालं आहे. ही गंधर्व लोकांत चालू होती व त्यामुळच तिथ सुखाची नुसती लयलूट होती. पुराणान्तरीं

पुष्कळ दाखले सांपडतात. दुष्यंतान शकुंतलेचं पाणिग्रहण याच पद्धतीन केलं.

मंजुळा — ह्यांत गोत्र वगैरे पाहतात का ?

मोहनराव — नाही. गांधर्वविवाहांत सुगोत्रापेक्षा सुगात्रांकडेच विशेष लक्ष दिलं जातं.

मंजुळा — मी तर विवाहपद्धतीच्या विरुद्ध आहें !

मोहनराव — मी देखील. या बाबतींत मी पक्का नवमतवादी आहें. आजकाल लग्नाच्या इतक्या मुली मोकाट हिंडत आहेत की लग्न न करण्यांतच मजा आहे. मावशी, सुहासिनीन जर लग्नाचाच हट्ट घेतला तर त्यांत तुमचीच बदनामी आहे. विवाह म्हणजे गुलामगिरी. तुम्ही स्वतंत्र राहणारीं पाखरं. हा गुलामगिरीचा स्वातंत्र्यावर विजय होईल.

मंजुळा — तें मला सारं कळतं. पण सुहासिनी ऐकेल तेव्हा खरं !

मोहनराव — हें बघ, विद्याधरचं म्हणणं तुला पटत नाही ना ?

मंजुळा — नाही.

मोहनराव — मग माझं ऐक. हरतऱ्हेन विद्याधरच्या घरीं जाण्याचा बेत हाणून पाड. मन्दा तिला फाडून खाईल म्हणून सांग. तिच्या मनांत भीति बसली म्हणजे मग जें करायचं तें करूं. याचा मोबदला तुला भरपूर मिळेल. का ग, सुहासिनी येण्याची वेळ झाली असेलच ?

मंजुळा — वेळ तर होऊन गेली परंतु आज दिवसभर ती इतकी उद्विग्न आणि उदास होती की तुम्ही तिला आज न भेटतां जाल तर बरं. शिवाय, विद्याधरसाहेब पण येणार आहेत.

मोहनराव — मग मला आलंच पाहिजे. त्याला एकदां झाडण्याचा माझा विचार आहे. त्यांचं भाषण रंगांत यायच्या सुमारासच मी

येईन. [मोहन जातो. मंजुळा कामास लागते. सुहासिनी येते.]

सुहासिनी — विद्याधर येऊन तर गेले नाहीत ना?

मंजुळा — नाही. पण मोहनराव येऊन गेले.

सुहासिनी — तूं त्यांना एकदा स्पष्ट सांग ना! मला त्या माणसाचं तोंड पाहायला नको.

मंजुळा — असं कसं बरं बोलतां येईल? माणसं जोडणं कठीण असतं! तोडायला कांही फार वेळ लागत नाही.

सुहासिनी — कांही माणसांना अगदी स्पष्ट सांगितल्याशिवाय कळतच नाही. मला तोडून बोलायचं मोठं जिवावर येतं. (चिडून) पण तूं कां नाही स्पष्ट सांगत?

मंजुळा — मीं आजपर्यंत कधी कोणाला दुखवलं नाही. माझ्याच्यान नाही व्हायचं तें! तूंहि हा वेडेपणा करूं नको. आपला जन्मच दुसऱ्याला सुखी करायकरिता आहे.

सुहासिनी — आपलं जन्माचं वाटोळं करून ना?

मंजुळा — (चिडून) हे भिकेचे डोहाळे आहेत बरं! आपल्या रक्ताला ही लग्नाची बेडी कधी सहन व्हायची नाही. लग्न करायला तरी कोण हरीचा लाल पुढं येणार आहे? नुसत्या बोलायच्या गोष्टी! विद्याधराच्या अर्थशून्य बडबडीवर जाऊं नकोस. वाघीण ज्याप्रमाणं आपल्या अर्भकाला हात लावल्यास चवताळते, तशा या लग्नाच्या बायका नवऱ्यासाठी करतात. सध्या विद्याधर तुझ्या मुठींत आहेत, ठीक आहे! म्हणून मोहनरावांना तोडून बोलण्यांत काय फायदा आहे? जितके लोक आपल्याकडे अधिक येतील, तितकी आपली प्रतिष्ठा अधिक नव्हे का?

सुहासिनी — मावशी, मी काय म्हणतें तें तुला नाही कळायचं ग, नाही कळायचं! तुझी वृत्ति डबक्यांतल्या किड्यासारखी आहे.

मंजुळा – पण तूं तर डबक्यांतलं कमळ आहेस ना ?

सुहासिनी – (जवळ जाऊन) मावशी, रागावलीस ? मी तुला टोचून नाही बोललें. मला अगदी या जीवनाचा कंटाळा आला आहे. आईला पण आला होता. म्हणूनच नंतर विद्याधराकडून माझा संभाळ करण्याचं वचन तिनं घेतलं होतं. [टेलिफोन येतो.] हॅलो....कोण ?....विद्याधर ?....हं....हं....मी सुहासिनी. हं.... काय ?....येतां ?....हो....हो....पण जर फार कामांत असाल तर उद्या या....तशी घाई नाही....काय म्हणतां नानासाहेब येणार आहेत ?....आणि तें कां....हो ? आलं लक्षांत (थोडा वेळ थाबून व हसून) मावशी, काय करूं ग ? कांही सुचत नाही. मी तुला आता एक कोडं घालतें. सांग त्याचं उत्तर.

मंजुळा – मी त्याचं काय उत्तर सांगणार ? पण हें काय तुझ्या मनांत आलं ?

सुहासिनी – मला अलीकडे कांही सुचेनासं झालं आहे. तेव्हा लहानपणचे खेळ खेळण्याची इच्छा झाली, दुसरं काय ?

मंजुळा – सांग पाहूं !

सुहासिनी – एक अतिशय पापी मनुष्य आहे.

मंजुळा – असलं घाणेरडं कांही नको !

सुहासिनी – पण ऐकशील तर खरी ? एक अतिशय पापी मनुष्य आहे. तो वीस वर्षांची शिक्षा भोगून परत येतो तों त्याचीं मुलं मोठीं होऊन सुखान संसार करीत असतांना त्याला दिसतात. दिवाळीचा सण आहे. तो भिकाऱ्यासारखा दाराजवळ उभा आहे. सणानिमित्त होणारा आनंद पाहून त्याला ओळख द्यावीशी वाटते. इतक्यांत त्याची मुलगी बाहेर येते, त्याला पाहते आणि न ओळखून दरवाजा बंद करते. आता प्रश्न असा, की त्यान

स्वतःची ओळख करून द्यावी का ?

मंजुळा — एवढा दिवाळीचा सण. त्यान ओळख पटवून द्यावी व व सुखान राहावं.

सुहासिनी — पण हीं कैद्याचीं मुलं असं लोकांना कळलं तर त्यांची छीः थूः नाही का व्हायची ? मग दिवाळीचा आनंद येईल का उपभोगतां ?

मंजुळा — (एकदम) मग नये ओळख देऊं ? अस्स ! हें कोडं होय ? आता आलं लक्षांत ! कांहीच्या बाहींच विचार करतेस झालं !

सुहासिनी — चल, सांग उत्तर. त्या म्हाताऱ्या बापान ओळख दिली तर मुलं दुःखी होणार; नाही दिली तर बाप दुःखी राहणार ! आता प्रश्न असा की कोणीं दुःखी राहावं ? बापान का मुलान ?

मंजुळा — (लक्षांत आल्यासारखं करून) तो कशाला प्रथम मरायला कैदेंत गेला एवढीं पोरं असतांना-पोरांचं सुख प्रथम पाहिलं पाहिजे.

सुहासिनी — मग बापान काय करावं ?

मंजुळा — त्याला म्हणावं जा पुनः चोरी करून कैदेत, किंवा भटक पृथ्वीच्या पाठीवर कुठहि ! तुला कसं वाटतं ?

सुहासिनी — या कोड्याचं हेंच उत्तर. आपल्या पापाचं फळ दुसऱ्याला काय म्हणून ? आपलं दुर्दैव आपल्यापाशी ! एका कुटुंबांतल्या मंडळींनी एकमेकांच्या सुखाकरिता इतका स्वार्थ-त्याग केलाच पाहिजे. आज दोन दिवस मी याचाच विचार करत होतें. हें कोडं सुटल्याबरोबर एकदम किती बरं वाटलं म्हणून सांगूं !

मंजुळा — म्हणून का तूं इतकी खिन्न होतीस ? [सुहासिनी विचार करीत स्वस्थ बसते.] तूं अशी स्वस्थ पडलीस की मला कसंसंच वाटतं.

सुहासिनी — कसा अगदी जीव कंटाळून गेला आहे ! कां कुणास ठाऊक, असं वाटतं की कांही तरी भयंकर होणार आहे.
[इकडे तिकडे अस्वस्थ चित्ताने फेऱ्या घालूं लागते.]

मंजुळा — सुहासिनी, इतका वेळ असं चांगलं बोललीस आणि एकदम हें असं काय करूं लागलीस ?

सुहासिनी — मी तरी काय करूं ? डोक्यांत नुसता विचारांचा कल्लोळ सुरू आहे. विद्याधर आता येतील. त्यांच्याशीं काय बोलूं ?

मंजुळा — कांही तरी कर म्हणजे जरा बरं वाटेल.

सुहासिनी — (असहायतेने) काय करूं म्हणजे या विचारांतून मी सुटेन ? (पुनः फेऱ्या. कोपऱ्यांत हार्मोनियम आहे तिकडे जाते व नुसतीं बोटें फिरविते.) नाही, कांही सुचत नाही. अशान तर मी वेडी होईन. [हार्मोनियमजवळ पत्त्यांचा जोड आहे तो घेते व पेशन्सचा डाव मांडते व गाणें गुणगुणूं लागते.]

(राग : कालंगडा. ताल : धुमाळी.)

उललेल्या ह्या हृदया
ठेवुं मी कुठे कसें ?
ठेवण्यास जाई जिथे,
तिथेच कांही बोचतसे,
नेतां जनसंमर्दी
बुजे बघुनि तें गर्दी,
एकान्तीं शून्यपणीं
अधिक उले ! शांति नसे !
निर्दय जनिं अवहेलन,
दाह करी वरि हासुन,
प्रीतिसुमनिं लपविन तरि
डंख कुणी मारि, डसे !

ब्रणविदारणांत निपुण,
लवणधार धरिती जन.
काय करूं ? कुठे जाउं ?
जीवित तुजवीण कसें ?

(ग. न. पंडित)

मंजुळे, हें ठेव बाई उचलून.

[थकल्यासारखी बसते. घंटा वाजते. विद्याधर प्रवेश करतो. मंजुळा पलीकडेच उभी राहते.]

विद्याधर — कसं काय ?

सुहासिनी — ठीक ! आज फार कामांत होतां ना ?

विद्याधर — चालायचंच; आज जरा मी विशेष कामांत होतों खरा पण संघाचं काम करण्यांतच मला खरा आनंद होतो. सुहासिनी, तूं पुढचा विचार काय ठरविला आहेस ?

सुहासिनी — आमच्यासारख्यांना विचार करण्याइतकं आशापूर्ण भविष्य असतं का ?

विद्याधर — हें बघ, कोणताहि समाज साधारणपणं रूढीप्रिय—पुराणमतवादी म्हणून अनुदार असतो. पण समाजाची वृत्ति कशी आहे याच्याशीं आपल्याला काय करायचं आहे ? समाजाच्या वृत्तीला कलाटणी देणं हें आपलं काम आहे तूं मन खंबीर कर. मी सर्व प्रकारची मदत करायला तयार आहे.

सुहासिनी — विद्याधर, हा माझा एकटीचा किंवा तुमचाहि प्रश्न नाही. मीं मन खंबीर करून काय होणार ! समाजान आपलं मन खंबीर केलं पाहिजे. मी गरजू आहें; समाज सत्ताधीश आहे, बेपर्वा आहे. लहान मुलं मुंग्या अथवा माशा सहज चिरडून टाकतात आणि त्याची त्यांना ज्याप्रमाण जाणीव

नसते तशी समाजाची स्थिति आहे. एखाद्या व्यक्तीला बेदर-कारपणान चिरडून टाकण्यांत समाजाला काडीचंहि दुःख होत नाही. आम्ही समाजाला पारखीं झालों आहोंत व समाज आम्हांला पारखा आहे. मनांत येतं की कुठ तरी उत्तर हिंदुस्थानांत जावं, अगदी अनोळखी ठिकाण पाहावं, लहानमोठी नोकरी मिळेल ती करावी, जात-गोत-नांव बदलून टाकावीं आणि ओळखीच्या जगाला पार विसरून जावं !

मंजुळा — विद्याधरसाहेब, हें असलं बोलणं हिला शोभतं का ?

विद्याधर — हा एक आत्महत्येचा नवीन प्रकार दिसतो व याचं स्वरूप आत्महत्येपेक्षा घोर आहे. अशा जीवन्मृत अवस्थेत राहण्यापेक्षा खरा मृत्यु पुरवला. सुहासिनी, तुझ्याच एकटीचा हा प्रश्न असता तर कदाचित् मीं तुझं म्हणणं मान्य केलं असतं. परंतु तूं हा देश सोडून जाणार याचा अर्थ माझ्या दृष्टीन असा होतो की समाजान तुझा धिक्कार केला आहे, तूं आंत येण्याचा प्रयत्न करीत असतांना त्यान तुझा अपमान करण्यासाठी आणि आपला कुलशीलाचा बडेजाव वाढविण्यासाठी दरवाजे एकदम बंद केले आहेत. (आवेशाने) नाही, नाही; समाजाला मी असं नीच कृत्य करूं देणार नाही.

सुहासिनी — विद्याधर, हा जुलमाचा रामराम कशाला ? बळजबरीन जर एखाद्याच्या घरांत शिरून आपण पाटावर जाऊन बसलें तर तो आपल्याला जेवूं घालील; नाही असं नाही. पण आगांतुक ते आगांतुक ! त्यांना थोडाच निमंत्रित पाहुण्यांचा मानसन्मान मिळणार आहे ?

मंजुळा — सुहासिनी, तूं कुठहि आगांतुक गेलीस तरी मालकीण होऊन तिथच राहशील.

सुहासिनी – मावशी !

विद्याधर – सुहासिनी, केवळ सुखासमाधानानं राहून आयुष्य खर्च करण्याकरितां परमेश्वरानं तुला जन्म दिलेला नाही. तूं इतरांपेक्षां अधिक स्वतंत्र, समंजस व सुशिक्षित आहेस. तूं पुढं हो व समाजानं बंद केलेल्या दारावर जोरानं थाप मार. थाप ऐकतांच दार बंद ठेवण्याची समाजाची प्राज्ञाच नाही. शील हें व्यक्तिनिष्ठ असतं. आईबापांचा इथं काय संबंध ? सुहासिनी, पतित कुलांत जन्माला आलीस हें तुझं दुर्दैव नसून सुदैव होय. तुझ्या हातून पतितांचा उद्धार व्हावा अशी परमेश्वराची इच्छा आहे.

मंजुळा – विद्याधरसाहेब, तुम्ही आम्हांला नेहमी पतित म्हणून हिणवतां ते तुम्ही घरंदाज म्हणून होय ? क्षेत्रांतल्या पंड्या-प्रमाणं आमच्या वह्या असत्या म्हणजे पुरी वंशावळ काढून दाखविली असती !

सुहासिनी – मावशी, तूं आंत जा बघूं ! विद्याधर माफ करा. तुमचं हें भाषण खरं समजूं कीं नाटकी समजूं ? तुम्ही पतित स्त्रियांचा उद्धार करण्याचा प्रयत्न करितां त्यामुळं तुम्हांला कीर्ति मिळते. जितकी तुमची सहानुभूति अधिक तितकी कीर्ति अधिक. परंतु तुमच्या वाढत्या कीर्तीबरोबर आमच्या पतित-पणाचं पारडं कांही हलकं होत नाही. कीर्तीचं साधन म्हणून तुम्हांला पतितपणा प्रिय. एरव्ही, त्यांत प्रिय वाट-णारं काय आहे ? तुमच्या जिव्हाळ्याच्या माणसाला हा पतितपणा चिकटूं लागला, तर हें दुर्दैव नसून सुदैव आहे हे विचार कायम राहतील का ?

विद्याधर – अगदी अचुक प्रश्न विचारलास. या तुझ्या प्रश्नामुळ

तुझ्या बुद्धिमत्तेविषयी मला वाटणारा आदर द्विगुणित झाला आहे. मी तुला काय उत्तर देऊं? माझ्याहि मनांत असा प्रश्न उत्पन्न झाला होता. मी पतित असतों तर? काय झालं असतं? कीर्तीच्या अभिलाषान मी हें कार्य करतों असं कोणींहि म्हटलं नसतं. परंतु एक अनपेक्षित दोष उत्पन्न झाला असता. माझ्या सर्व खटपटीला स्वार्थाचं गालबोट लागलं असतं. कुलशीलवंताच्या बरोबर बसण्याकरिता ही सारी खटपट आहे असं लोकांनी म्हटलं असतं. आहे यापेक्षा परिस्थिति निराळी असती तर काय झालं असतं याचा विचार करण्यापेक्षा, आहे या परिस्थितींत काय करतां येण्याजोगं आहे हें पाहिलं पाहिजे. कार्य करण्याची महत्वाकांक्षा बाळगणाऱ्या मनुष्याचा हेतु शुद्ध आहे किंवा नाही हे पाहणंच सर्वांत अधिक अगत्याचं आहे.

सुहासिनी — मनांत आपली शंका उद्भवली म्हणून मीं विचारलं इतकंच.

विद्याधर — त्या शंकेचं समाधान म्हणून मी सांगतों की, माझ्या जिव्हाळ्याच्या माणसाला हा पतितपणाचा डाग लागलेला असला किंवा उद्या मीच निष्कुलीन ठरलों तरी त्यांत मला यत्किंचितहि वाईट वाटणार नाही. सुहासिनी, जन्म हा दैवाधीन असतो. त्याबद्दल व्यक्तीला जबाबदार कां धरायचं? गुणावरच व्यक्तीची योग्यता अवलंबून असते. ऋषीचं कुळ पाहूं नये ही म्हण कां पडली असती? समाज ज्यांना पतित समजतो अशा लोकांत आजपर्यंत किती तरी थोर थोर विभूति निर्माण झाल्या आहेत. आजच्या दुधखुळ्या समाजाला ह्या गोष्टी पटत नाहीत ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. आता तुझा उत्तर हिंदुस्तानांत जाऊन परदेशी होण्याचा, मराठी

विसरून हिंदुस्तानी बोलण्याचा बेत बदलला असं समजून तुझ्या आईनं लिहिलेलं पत्र मी मागूं का ?

मंजुळा – सुहासिनी, चहाची तयारी आहे. का बाहेरच आणूं ?

सुहासिनी – (विद्याधराकडे पाहून) काय ?

विद्याधर – मंजुळामावशी, काय जरूरी होती ? (सुहासिनीस) जाऊं की आंत.

[आत जातात. घंटा वाजते. मंजुळा बाहेर येते. मोहन येतो.]

मंजुळा – चहा चाललाय.

मोहनराव – जाऊं का आंत ?

मंजुळा – ती तुमची एटिकेट बेटिकेट आहे ना ? आमच्या वेळेला हें आंत बाहेर कांही नव्हतं. मी सांगतें सुहासिनीला.

[मंजुळा जाते. मोहन सिगारेट पेटवून धुराकडे पाहत उभा आहे.]

सुहासिनी – (प्रवेश करून) मोहनराव, मी जरा कामांत आहें.

मोहनराव – कां ? तुझ्या सृष्टींत फक्त विद्याधरालाच जागा आहे ?

सुहासिनी – माझी सृष्टि नुसती उजाड पडली आहे.

मोहन – अग, पण ती आबाद करण्याचं काम तुझ्या आईन माझ्यावर सोपविलं आहे ना !

सुहासिनी – आईच्या नांवाचा उल्लेख करूं नका. सर्व अप्रिय आठवणी विसरून फक्त तिच्या प्रेमाचीच स्मृति आता शिल्लक उरली आहे. माझ्या नवीन जीवनाला आरंभ झाला आहे आणि त्यांत तुम्हांला स्थान नाहीं हें मी अनेक वेळां सुचविलं. आता स्पष्ट सांगतें.

मोहन – मग आता बाहेर पाटी लाव. नो थरोफेअर (No thoroughfare) म्हणून. ट्रेसपासर्स विल बी प्रॉसीक्यूटेड (Trespassers

will be prosecuted) वा ! विद्याधर विवाहित आहे माहित आहे ना ?

सुहासिनी — आणि म्हणूनच माझा त्यांच्यावर विश्वास आहे.

मोहन – अरे वा ! विवाहित पुरुषांना अलीकडे बराच भाव आलेला दिसतो ! (सुहासिनीच्या चेहऱ्यावर संताप दिसू लागतो.) आमच्या-सारख्या सडेफटिंगांना आता आशाच नाही.

सुहासिनी — काय तोंडाला येईल तें बोलतां झालं !

मोहनराव — विवाहित पुरुषाइतका दगलबाज प्राणी जगांत दुसरा सांपडणार नाही. त्याला बायको आहे या एकाच कारणामुळं तुझ्यासारख्या गाफील मुली निर्भयपणं त्याच्याजवळ जातात आणि त्याच्या जाळ्यांत अडकतात, आणि त्याची सर्व पापं बायकोच्या पदराआड लपून बसतात. त्याच्या गनिमी काव्यांत बायको ही लपून बसण्याची सुरक्षित जागा आहे.

सुहासिनी — मोहनराव, या बाबतीत तुमच्या उपदेशाची मला जरुरी नाही. पुरुषांच्या दृष्टीवरून त्याच्या अंतःकरणाचा ठाव आम्हांला बरोबर अचूक घेतां येतो समजलांत ? विद्याधरांच्या दृष्टींत दिस-णारा सात्त्विक भाव पाहून कोणीहि त्यांच्यावर विश्वास ठेवावा !

मोहनराव — मग माझ्या डोळ्यांत तुला कोणता भाव दिसतो ?

सुहासिनी — तुमच्या डोळ्यांत मला प्रचंड आग दिसते, असह्य भया-नकता दिसते, इतकी भयंकर कामुकता दिसते की तुम्ही जगांतल्या कोणत्याहि स्त्रीकडे निर्हेतुक, निष्पाप दृष्टीन पाहूंच शकत नाही असं मला वाटतं.

मोहनराव — सुहासिनी, आज तूं कोणत्या गुर्मीत आहेस ? विद्याधराच्या गोड गोड थापांवर भुलून तूं माझा असा उपमर्द करतेस ? मी तर आज तुला विवाहाचं वचन देण्यासाठी आलों होतों.

सुहासिनी — तुमच्याशीं विवाह करण्यापेक्षा मी सरळ आगींत उडी घेईन. तुमच्याशीं लग्न करण्यापेक्षा कांही माझा पिढीजाद धंदा वाईट नाही.

मोहनराव — मग विद्याधरजवळ तरी तूं कोणत्या नात्यान राहणार आहेस तें तरी कळूं दे ! म्हणजे कण्वान शकुंतलेला केलेला उपदेश मी तुला करीन— बाई ग, आपल्या सपत्नीजनांशीं— म्हणजे प्राकृतांत सवतीशीं— प्रेमळ वर्तन ठेव. मन्दा माझी, मानलेली का असेना, पण बहीण आहे !

सुहासिनी — हीं निर्लज्जपणाचीं बोलणीं मीं मुळीच सहन करणार नाहीं.

मोहनराव — काय पतिव्रतेचा आव आणला आहेस ! सुहासिनी, विद्याधरासारख्या रुक्ष, तत्त्वान्वेषी माणसापेक्षा, माझ्यासारख्या सौंदर्योपासक माणसाकडूनच तुला सुख होईल. सुहासिनी, तुझ्या सौन्दर्याची तुला कल्पना तरी आहे का ?

सुहासिनी — मोहनराव, अगदी पुरेपूर कल्पना आहे. सुंदर देहाला जगांत किती किंमत येते, याचं शिक्षण घेण्यांत पिढ्यान् पिढया आमच्या गेल्या आहेत, समजलांत ? कवडी कवडी जमा करून दहा पांच हजार बँकेंत जमा करणारांना सौन्दर्याचा व्यापार करतां येत नाही. हिऱ्या-मोत्यांचा व्यापार करणारा कोट्याधीश असावा लागतो. तें तुमचं काम नाही. म्हणे तूं किती सुंदर आहेस ! तुम्ही जा आता.

मोहनराव — सुहासिनी, मला तुझ्याशीं कांही गोष्टी अगदी स्पष्टपणं बोलायच्या आहेत. विद्याधर इथ असेपर्यंत तुझं डोकं ताळ्यावर नसणारच. मी पुनः येईन.

[जातो. सुहासिनी आंत जाण्यास वळते तों विद्याधर बाहेर येतो.]

विद्याधर — गेला मोहन. (दरवाज्याकडे पाहतो. अधिक बोलावें किंवा

नको याचा विचार करतो.) नानासाहेबांना मीं चार वाजतां बोलावलं आहे. त्यापूर्वी तें पत्र पाहून टाकलेलं बरं म्हणजे त्यांच्या सल्ल्यान पुढील बेत करतां येतील.

सुहासिनी – पत्र मागण्याचा तुमचा अधिकार आहे हें कबूल, पण मीं तें पत्र तुमच्या हातांत दिलंच पाहिजे असं आहे का ?

विद्याधर – (विचार करीत) सुहासिनी, तुझा पालक म्हणून तुझं आणि तुझ्या संपत्तीचं मीं रक्षण करावं असं वचन तुझ्या आईन माझ्याकडून घेतलं आहे. तुझं ज्यांत सर्वथैव कल्याण असेल तीच गोष्ट मी तुझ्या संमतीन करीन. मनांत शंका आणूं नकोस.

सुहासिनी – विद्याधर, तुमचा गैरसमज झाला. तुमच्या सद्धेतूविषयी माझ्या मनांत आजपर्यंत कधी शंका आली नाही, आजहि नाही, पुढहि येणार नाही, परंतु तें पत्र तुमच्या हातीं पडूं नये अशी इच्छा आहे. आईनं त्या पत्रांत आपल्या जीवितांतील सर्व रहस्यं सांठवून ठेविलीं आहेत. त्यांतला मजकूर वाचून मला देखील धक्का बसला, मग तुमची काय अवस्था होईल? तिचं विल (will) मी तुमच्या ताब्यांत देतें. त्याप्रमाण व्यवस्था करा.

विद्याधर – सुहासिनी, तुझ्या आईचीं रहस्यं जाणण्याची माझी इच्छा नसून मीं काय करावं अशी तिची अपेक्षा आहे हें मला नीटपणं समजावून घेतलं पाहिजे. सुहासिनी, तूं निःसंकोच मनान तें पत्र माझ्या हातीं दे. त्याचा मी दुरुपयोग करणार नाहीं अशी खात्री ठेव.

सुहासिनी – विद्याधर, तुम्ही त्या पत्राचा दुरुपयोग तो काय करणार ! मला ती भीति वाटत नाही, परंतु तें पत्र वाचून तुम्हांला दुःख होईल. तुम्हांला आम्हीं इतका त्रास देणं शोभत नाहीं.

नका विद्याधर, तें पत्र मागूं नका. तें पत्र न वाचतां देखील तुम्ही मला मदत करूं शकाल. मला जन्माची ऋणी करून ठेवाल. विद्याधर, मी तें पत्र देणार नाहीं.

विद्याधर — तें पत्र वाचून दुःख न वाटू देण्याइतकं मी माझं मन निष्ठुर करूं शकतो. सुहासिनी, तुझ्या आईनं तें पत्र मला देण्यासाठी मोठ्या विश्वासान तुझ्या हवालीं केलं, आणि तें तूं मला न देणं म्हणजे आपल्या मृत मातेशी प्रतारणा करण्यासारखं नाही का ?

सुहासिनी — मी इतकी कळवळून नाही म्हणतें त्याचं तुम्हांला कांहीच कसं वाटत नाही, विद्याधर ?

विद्याधर — सुहासिनी, पण तें पत्र पाहिल्याशिवाय तुझ्या आईची इच्छा मला कशी कळणार ?

सुहासिनी - तुमची इच्छा ! मावशी, ए मावशी ! (पडद्यात 'आलें अं.' मंजुळा येते.) हें बघ मावशी, माझ्या खोलींत जा आणि उशी-खाली माझी बॅग आहे ती घेऊन ये बरं. (मंजुळा जाते) विद्याधर, अजून विचार करा. मी नाही म्हणते त्याला तसंच कारण आहे. त्या पत्रांत अशा कांही गोष्टी आहेत की त्यां-मुळ एखादा सुखी संसार उधळून जाता. अजून हट्ट सोडा.

विद्याधर — तुला माहीत आहे की मला सत्य अत्यंत प्रिय आहे. जगांत मला दोन गोष्टी प्रिय आहेत. एक सत्य आणि दुसरी कोणती बरं ? (सुहासिनी गोंधळते.) मन्दा. या दोहोंत अधिक कोणती प्रिय याचा निर्णय अजून लागला नाही; परंतु मन्दाविषयी वाटणाऱ्या प्रेमावर देखील सत्य मात करील असं वाटतं. सुहासिनी, मी हट्टाला पेटलों नाहीं, परंतु तें पत्र मला पाह्यला नको का ?

सुहासिनी – तुम्हांला मन्दाताईविषयी वाटणाऱ्या प्रेमाची शपथ घालून सांगतें की तिच्या सुखासाठी तरी हा भलताच हट्ट सोडा.

विद्याधर – (एकदम दचकून) आता तर तें शक्य नाही. मन्दाचं सुख तें माझं सुख; म्हणजे पार्यायान स्वतःच्या सुखासाठी मी सत्याला अंधारांत राहूं देणार नाहीं. [ मजुळा येते.]

सुहासिनी – पहा विचार करा. (बॅग उघडते.) एकच क्षण पत्र वाचण्याचा मोह सोडून द्या. आज तुम्हांला रमणीय वाटणारं विश्व वणव्यांत सांपडून दग्ध झालेल्या अरण्याप्रमाण उजाड दिसूं लागेल. परमेश्वर प्रेमस्वरूप नसून दुष्ट आणि निर्दय आहे असं वाटूं लागेल. तुमचा जगाच्या चांगुलपणावरचा विश्वास पार उडून जाईल. जगांतील सौंदर्याचा तुम्हांला वीट येऊं लागेल. विद्याधर, नका पाहूं तें पत्र.

विद्याधर – नाही, सुहासिनी, सत्यमेव जयते. तें केव्हा तरी वर डोकं काढणारच. मग आजच तें कां नको ? आण तें पत्र इकडे.

सुहासिनी – तुमची इच्छा !

[ पत्र वाचतो. स्तब्धता. मजकूर वाचून विद्याधरला धक्का बसतो व हातावर डोकें ठेवून स्वस्थ बसतो. सुहासिनीचा चेहरा उतरतो.] किती दारुण हें सत्य ! (श्वास टाकतो.) मन्दा– सुहासिनी, एका आईच्या मुली– सख्या बहिणी– आता माझ्या मन्दाची काय अवस्था होईल ? सत्यस्वरूप परमेश्वरा, माझ्या मन्दाला शक्ति दे. तिला केवढा धक्का बसेल ! फार नाजुक अंतःकरणाची आहे पोर. [ पुनः स्तब्धता ] सुहासिनी, (सुहासिनी आपल्या तंद्रींतून जागी होते.) सुहासिनी, हें पत्र वाचून मी क्षणभर स्तिमित झालों हें खरं. सारं विश्व भोवतीं गरगर

फिरूं लागलं आहे असा भास झाला. मनुष्याचं मन कितीहि सुधारलं तरी तो आंतल्या आंत रूढिप्रिय असतो तो असा. क्षणभर मोहाचं पटल डोळ्यांवर आलं हें मी कबूल करतों. परंतु तें मीं फाडून फेकून दिलं. पुनः दृष्टि साफ झाली. पण मन्दाचं कसं होणार? सुहासिनी, तुला कल्पना नाही, तुझी बहीण किती मानी आहे. तिच्यांत एकच दोष आहे. तो म्हणजे तिचा कुलशीलाविषयींचा अभिमान. या अभिमानाला धक्का बसतांच तिला प्राणांतिक वेदना होतील.

सुहासिनी — विद्याधर, विद्याधर, तुम्ही आहांत तरी कोण? दीनांचा उद्धार करण्यासाठी परमेश्वर अवतार घेतो म्हणतात. तसा तुमच्या रूपान परमेश्वर अवतीर्ण झाला नाही ना?

विद्याधर — चल! वेडी कुठली! या पत्रावरून तें विल (Will) माझ्या घरीं वाचलं जावं अशी तुझ्या आईची इच्छा दिसते. अर्थात् ही गोष्ट ताबडतोब शक्य नाही. मला मन्दाच्या मनाची तयारी या प्रसंगाकरिता केली पाहिजे. काय दुर्दैव आहे पाहा! मी नानासाहेबांना कशाला आणखी येथ बोलावलं?

[ मन्दा बॅग ठेवण्याच्या निमित्ताने आंत जाते. विद्याधर विचारमग्न दिसतो. हळू हळू त्याचा चेहरा दुःखी दिसूं लागतो. त्याला एकंदर परिस्थिति असह्य वाटते हें स्पष्ट दिसतें. नानासाहेब प्रवेश करतात. ]

नानासाहेब — (घाबरून) विद्याधर, असा एखाद्या आजारांतून उठल्याप्रमाणे कां एकाएकीं दिसूं लागलास? दोन तासांपूर्वी मीं तुला पाहिला ना?

विद्याधर — नुसत्या आजारांतून नाही; अगदी जिवावरच्या दुखण्यांतून!

नानासाहेब — सुहासिनी कुठ आहे? कांही कमीजास्त? सर्व ठीक आहे ना?

विद्याधर – सुहासिनी येईल इतक्यांत. नानासाहेब, मन्दाच्या माता-पित्यांचा आपल्याला कधी शोध लागला का ?

नानासाहेब – नाही. ती अगदी लहान होती तोंवर ती मला कशी सांपडली हें मी सर्वांना सांगत असें. परंतु त्या हकीकतीमुळ तिला वाईट वाटेल म्हणून पुढ पुढ ती माझ्या मित्राची एकुलती एक कन्या असं मी सांगूं लागलों. आजपर्यंत तिच्या जन्मा-संबंधी मला कांहीं कळलं नाही. त्या अपघातांत जीं पांच दहा माणसं मेलीं त्यांपैकींच ती कोणाची तरी असावी ह्या पलीकडे मला कधी कांहीं कळलं नाहीं. सुरवातीला मला वाटत होतं की कोणीतरी येऊन तिला घेऊन जाईल. पुढ माझंहि तिच्यावर इतकं प्रेम बसलं की तिला दूर करण्याची कल्पना मला सहन होईनाशी झाली.

विद्याधर – नानासाहेब, तिच्या जन्माची हकीकत मला नुकतीच समजली आहे !

नानासाहेब – हं.

विद्याधर – नानासाहेब, मन्दाची आई एक समाज बहिष्कृत पतिता होती.

नानासाहेब – काय ? खरं ? मग ती त्या अपघातांत मेली असली पाहिजे. ही हकीकत आज इतक्या वर्षांनंतर तुला कशी कळली ?

विद्याधर – अनेक लोक त्या अपघातांत मरून त्यांचीं पोरंबाळं त्या ठिकाणीं असहाय पडलेलीं पाहून हिनहि आपली मुलगी त्या ठिकाणीं टाकून पुढ काय होतं तें पाहत राहिली. उद्देश हा की चांगल्या माणसाच्या हातीं पडून तिला पुढ चांगले

दिवस दिसावेत. आपण त्या निःसहाय अर्भकाला उचलतांच तिला समाधान वाटलं व ती तेथून चालती झाली.

नानासाहेब — ती बाई अजून जिवंत आहे ?

विद्याधर — नाही. ती नुकतीच वारली.

नानासाहेब — अरेरे ! मरतांना तिन आपल्या पापाला कशाला बरं उजेडांत आणलं ? विद्याधर, मन्दाला यांतलं कांही कळलं का ?

विद्याधर — नाही पण लवकरच कळेल.

नानासाहेब — तिला अपरिमित दुःख होईल !

विद्याधर — पण काय करायचं ? नानासाहेब, खरी गोष्ट केव्हा तरी बाहेर ही पडणारच. शिवाय सध्याचं संशयाचं वातावरण पुन्हा शुद्ध व पवित्र होण्याला ह्या गोष्टीची मदत होणार आहे. नानासाहेब, मन्दाच्या दुःखाच्या मुळाशीं तिला स्वतः-च्या प्रतिष्ठेबद्दल वाटणारा जाज्वल्य अभिमान आहे. तिच्या मजविषयीच्या भावना सध्या कलुषित झाल्या आहेत, त्या पूर्व-वत् निर्मळ व्हायला पाहिजेत. युक्तिवादांत ती नेहमी हरते, परंतु ह्या कल्पना तिच्या मनांत इतक्या खोल रुजल्या आहेत की त्या सहजासहजी काढून टाकणं शक्य नाही.

नानासाहेब — पण तिच्या जन्माचा इतिहास व तुमचं दुरावलेलं हल्लीचं प्रेम यांचा कसा संबंध येतो ?

विद्याधर — तसा संबंध नाही. परंतु आज आणखी एक रहस्य उघड झालं आहे. त्यावरून सर्व गोष्टींचा निकाल समाधानकारक लागेल असं दिसतं. ही सुहासिनी कोण असावी असं तुम्हांला वाटतं ?

नानासाहेब — मी काय सांगू ? मला कांही कल्पनाच नाही.

विद्याधर — कल्पना येणंच शक्य नाही. जगांत इतकी अद्भुतता

आहे असं मला कधीहि वाटलं नाही, परंतु प्रत्यक्ष सृष्टींत कांही वेळां असे प्रसंग उद्भवतात की त्यांमुळ कल्पनासृष्टि देखील फिकी वाटूं लागते. नानासाहेब, सुहासिनी ही मन्दाची धाकटी बहीण.

नानासाहेब — (धक्का बसल्याप्रमाणे) काय म्हणतोस विद्याधर ?

विद्याधर — ही गोष्ट मला इतक्यांतच कळली आणि हा माझ्यासंबंधीचा गैरसमज गेल्या वीसपंचवीस दिवसांतला आहे. आतां ही गोष्ट मी मन्दाला कळविणार आहे, एरव्ही कदाचित् मीं कळविली नसती, परंतु ही गोष्ट कळविल्यान दोन इष्ट हेतु साधण्याजोगे आहेत. एक तर तिचा लब्धप्रतिष्ठितपणा दूर होईल आणि सुहासिनीची योग्य व्यवस्था लावतां येईल. नानासाहेब, तुमची आणि सुहासिनीची भेट व्हावी म्हणून मीं तुम्हांला इथ बोलाविलं आहे. तिला पाहतांच तुमच्या मनावर काय परिणाम होतो तो मला सांगा म्हणजे तिच्याकरिता मीं केलेले आटोकाट प्रयत्न अस्थानीं नव्हते, याची खात्री वाटेल.

[ सुहासिनी प्रवेश करते. ]

नानासाहेब — तूं म्हणतोस तें सर्व खरं, पण... पण.... मन्दाची काय अवस्था होईल ?

विद्याधर — नानासाहेब, हिला मन्दाची बहीण म्हणून ओळखणं कांहीं कठीण आहे का ?

नानासाहेब — मुळीच नाहीं; तीच भिवयांची ठेवण, अगदी तीच डोळ्यांची. खरोखरच सुहासिनीबाई, तुमची माझी आकस्मिक गांठ पडली असती तरी देखील हें साम्य माझ्या लक्षांत आलं असतं.

विद्याधर – नानासाहेब, या दोघी बहिणींत एक मात्र फरक आहे. मन्दा जितकी तापट तितकी ही शान्त आहे.

सुहासिनी – विद्याधर, हा शान्तपणा नाही बरं! हा दुबळेपणा आहे. परिस्थितीपुढं नमलेल्या मनुष्याची ती वृत्तिच होते. अनुकूल परिस्थितीमुळं, मन्दाताईच्या अंगीं एक प्रकारची तेजस्विता आली आहे, तर प्रतिकूल परिस्थितीमुळं, माझ्या अंगीं एक प्रकारचा नेभळेपणा आला आहे.

नानासाहेब – सुहासिनीबाई, तुमची गांठ पडली, किती आनंद वाटला म्हणून सांगूं! मी तुम्हांला भेटायला फार उत्सुक झालों होतों. विद्याधर, मगरीच्या दाढेतून एखादं रत्न मोठ्या शिताफीन काढावं त्याप्रमाण परिस्थितीच्या दाढेंतून तूं हें स्त्रीरत्न ओढून काढलं आहेस. सुहासिनी, मला क्षमा कर अं या एकेरी नांवाची. मी आपल्याच तंद्रींत होतों. विचार करीत होतों की या नांवांत एवढी जादू कशी भरली आहे! किती प्रसन्नता! किती पावित्र्य! किती गोड नांव! विद्याधर, नांवांत काय आहे असं विचारणारांना हें नांव सांगावं. विद्याधर, या नांवांत अशी काय मोहिनी सांठवलेली आहे बरं?

विद्याधर – मलाहि पण हें नांव अतिशय रमणीय वाटतं.

सुहासिनी – मी सांगूं का? हें नांव साधारणपणं अपरिचित असल्या-मुळ तुम्हांला त्याचं कौतुक वाटत असेल, परंतु मला या नांवाचा इतका वीट आला आहे, की कांही विचारूं नका.

नानासाहेब – (दुर्लक्ष करून) आलं लक्षांत. (उल्हासाने) सुहासिनीम् सुमधुरभाषिणीम् अशी आपली मातृभूमि आहे. दैवदुर्विलासामुळ मातृभूमीला जी दुःस्थिति प्राप्त झाली आहे ती एखाद्या व्यक्तीला प्राप्त होणं अगदी साहजिक आहे. मातृभूमीची खरी अवस्था

अशा चालत्याबोलत्या तिच्या लहान प्रतिकृति पाहिल्या-शिवाय लक्षांत येणार नाही. सुहासिनीबाई, एकदा पुढील व्यवस्था लागली म्हणजे एखादं निश्चित कार्य अंगावर घ्या म्हणजे झालं.

सुहासिनी — नानासाहेब, माझ्या हातून या आयुष्यांत कांही घडून येईल असं मला वाटत नाही. इतकी थोर पुण्याई असती तर ही आजची दशा कशी प्राप्त झाली असती ?

विद्याधर — मीं तुला सांगितलं ना की तुझ्या हातून मोठं सामाजिक कार्य होणार आहे म्हणून ?

सुहासिनी — विद्याधर, तुम्ही मला अनेक प्रकारांनी उत्साहित करतां परंतु त्यामुळ स्वतःविषयी अमर्याद कल्पना करण्याइतकी मी कांही खुळी नाहीं. नानासाहेब, विद्याधरांचे उपकार मी कधीहि विसरणं शक्य नाही. पाठचा भाऊ पाठीशीं उभा राहणार नाही, अशा तऱ्हेन यांनी मला मदत केली आणि सांगायची गोष्ट अशी, की मन्दा माझी बहीण हें कळून देखील हे पहिल्याइतकेच शान्त. जगाचा वीट येऊन देखील जगावंसं वाटत तें यांच्यासारख्या थोर पुरुषांमुळच.

विद्याधर — सुहासिनी, माझी स्तुति ऐकण्यासाठी मी येथे आलों नाहीं.

सुहासिनी — विद्याधर, आजपर्यंत तोंड भरून तुमच्याबद्दल बोलायला मला श्रोता लाभलाच नाही. आज जर नानासाहेबांच्या-पुढ मीं मन मोकळं केलं नाही तर तें करूं कुठ ?

नानासाहेब — पण हा वाद पाहिजे कशाला ? बरं विद्याधर, आता पुढचा बेत ?

विद्याधर — नानासाहेब, सुहासिनी मन्दाची बहीण आहे हें कळल्या-मुळ पुढला मार्ग फार सुकर झाला आहे. हा सर्व प्रकार घरीं

जातांच मन्दाला समजावून सांगतों आणि संध्याकाळीं विल (will) वाचण्यासाठी हिला घरीं बोलावतों; एरव्ही मोठी अडचण पडली असती. नानासाहेब, गेल्या चार दिवसांत ज्या मानसिक यातना मला सहन कराव्या लागल्या त्यांची आता कल्पनाहि सहन करवत नाही. परमेश्वरालाच दया येऊन या साऱ्या गोष्टी अशा रीतीनं पार पडण्याची सोय निघाली.

नानासाहेब – हें असं चालायचंच. स्त्रीपुरुषसंबंधाला आपल्या समाजांत इतकं कांही विकृत स्वरूप प्राप्त झालं आहे की, समाजाला जिकडेतिकडे पापच दिसत असतं. विद्याधर, सुहासिनी मन्दाची बहीण ठरली नसती, तर कदाचित् माझं समाधान करायलासुद्धा तुला थोडेबहुत परिश्रम करावे लागले असते. मीं माझ्या मनाला कितीहि निराळं वळण लावलं असलं, तरी शेवटीं मी देखील रूढ वळणावर गेलों असतों.

विद्याधर – नानासाहेब, आपल्याविषयी मनांत क्षणभर देखील शंका आली नाही. सारं जग विरुद्ध गेलं असतं तरी तुमच्या एका प्रेमळ शब्दाच्या विश्वासावर मीं साऱ्या जगाला तुच्छ लेखलं असतं. सुहासिनी, सारं जग काव काव करीत असतांना किती प्रेमानं वागविलं पाहिलंस ना? नानासाहेब, सुहासिनीला आशीर्वाद द्या. तिला आशीर्वाद देणारं माणूस आपल्याशिवाय दुसरं कोणीहि नाही.

नानासाहेब – सुहासिनी.... सुहासिनीबाई –

सुहासिनी – नानासाहेब, सुहासिनीच ठीक नाही का? मी आपल्या मन्दाची बहीण ना?

नानासाहेब – सुहासिनी, तुला काळजी करण्याचं आता मुळीच कारण नाही. तूं आता आमच्यापैकी झालीस. तुझं सुख तें

आमचं सुख, यापेक्षा मी अधिक आश्वासन तें काय देणार?

सुहासिनी — यापेक्षा अधिक तें काय पाहिजे? आंधळ्याला दृष्टिलाभ व्हावा त्यांतलाच हा प्रकार नाही तर काय? जगांत असहाय म्हणून दृष्टि मिटून स्वस्थ होतें, तों अगदी स्वप्नांतल्याप्रमाण संरक्षण करण्यासाठी हाताशीं भाऊ सापडला आणि धीर द्यायला आपण पुढ आलांत.

नानासाहेब — विद्याधर, जातों मी. सुहासिनी —

[सर्व उठतात. नानासाहेब जातात.]

विद्याधर — आता बोलणं झालं, त्याप्रमाण संध्याकाळीं तूं आमच्याकडे ये, तें विल घेऊन.

सुहासिनी — मन्दाताईला यांतलं कांही न कळवतां भागणार नाही का?

विद्याधर — तें तूं सर्व माझ्यावर सोपव. (घड्याळाकडे पाहात) आता साडेचार वाजले आहेत. मी समाज-सेवा-संघाच्या अध्यक्षांना भेटून घरीं जातों. तुझं नांव संघांत नोंदलं असल्यामुळ मला स्वतंत्रपणान कांही करतां यायचं नाही. तूं साडेसहाच्या सुमारास घरीं ये.

[दरवाज्यांत मोहन दिसतो.]

सुहासिनी — बरं!

विद्याधर — सुहासिनी, तुला या इथल्या वातावरणांत एकटं सोडून जाण्याचं फार जिवावर येतं. पण थोडे तास तुला दूर राहणं प्राप्त आहे. कांही अडचण वाटली तर निःसंकोच मनान टेलीफोन कर. आता परकेपणाचा प्रश्न उरला नाही.

[मोहन पुढे येऊन]

मोहनराव — काय विद्याधर? तुमच्या एकान्तांत व्यत्यय नाही ना आला? (विद्याधर बोलत नाही हें पाहून) हे उदारधी पुरुष आज

फार तोऱ्यांत दिसतात.

सुहासिनी — मोहनराव, मी बोलण्याच्या मनःस्थितींत नाहीं. (जाऊं लागते. थाबून) आणि तुमच्याशीं बोलण्याजोगी मनःस्थिति या जन्मांत होईल असं वाटत नाही. (जाते.)

मोहनराव — आज वातावरण गरम दिसतंय ?

विद्याधर — मोहन, मला तुझ्याशीं कांही खासगी बोलायचं आहे ?

मोहनराव — मग तें या सार्वजनिक ठिकाणीं कशाला ? तुझीं व्याख्यानं ऐकून माझे कान किटले आहेत. अशीं व्याख्यानं एखाद्या शाळेंतील पोराप्रमाणं निमूटपणं ऐकून घ्यायला मी तयार नाहीं.

विद्याधर — उनाड पोरं— मग ती शाळेंतलीं असोत किंवा शाळे-बाहेरील असोत— उपदेश ऐकायला केव्हाहि तयार नस-तात, म्हणून त्यांना उपदेश करूं नये, असं थोडंच आहे ? मी जें तुला सांगणार आहें, त्यांत माझ्याइतकं तुझंहि हितच आहे.

मोहनराव — माझं हित पाहायला माझा मी समर्थ आहें. तुझ्या हिताची किंवा अहिताची काळजी करण्याचं मला कारण नाही. तेव्हा आपण एकमेकांशीं न बोलणंच योग्य नाही का ?

विद्याधर — मीहि कांहीं बोलण्यास उत्सुक नाहीं. परंतु माझ्या सुखांत तूं जी निष्कारण ढवळाढवळ चालविली आहेस....

मोहनराव — तुझ्या सुखांत ? सुहासिनी काय तुझ्या बापाच्या माल-कीची आहे ?

विद्याधर — तोंड संभाळून बोल.

मोहनराव — लिलावांत बोली कोणींहि लावावी ! चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात त्या ह्याच ! विद्याधर, सुहासिनीवर माझं प्रेम

आहे हें माहीत असतांना तिचं प्रेम आपल्याकडे कोणीं ओढून घेतलं ? माझ्या सुखांत कोणीं ढवळाढवळ केली ?

विद्याधर — मला तें माहीत नाही. सुहासिनीच्या जीविताचा सत्यानाश करण्याचा तुझा विचार होता म्हणून—

मोहनराव — आणि आपण आता काय तिचा उद्धार करणार आहांत ? विद्याधर, तत्त्वज्ञानाच्या गोष्टी बोलून वाटेल त्या कृत्यावर मुलामा चढवितां येत नाही. सुहासिनीचे व तुझे कशा प्रकारचे संबंध आहेत, हें साऱ्या जगाला ठाऊक आहे.

विद्याधर — मला काय जगाची पर्वा ? जगाला असल्या गोष्टी कळून घेण्याची अक्कल आहे कुठ ?

मोहनराव — मग मन्दाला जाऊन विचार.

विद्याधर — बस्स. तिचं नांव घेऊं नकोस. तूंच तिचं मन मजविषयी कलुषित केलंस. तिच्या भाबड्या स्वभावाचा फायदा घेऊन तिच्या मनांत तूंच संशय उत्पन्न केलास. सैतानाच्या तोंडांत ज्याप्रमाण देवाचं नांव शोभत नाही, त्याप्रमाण तुझ्या तोंडांत मन्दाचं नांव शोभत नाही.

मोहनराव — (मोठ्याने हंसून) काय पण बायकोचा अभिमान ? बाबा रे, हा अभिमान केवळ शब्दांत न राहतां कृतींत उतरेल, तर ती तरी बिचारी सुखी होईल ! बरं, तूं मला खाजगी तें काय सांगणार होतास ?

विद्याधर — हेंच सांगणार होतों, की माझ्यापासून दोन हात दूर राहत जा. तूं कितीहि प्रयत्न केलेस, तरी तुझ्या हातून माझं कांहीहि नुकसान होणार नाही. आणि संध्याकाळीं जो चमत्कार दिसणार आहे तो पाहशील तर आश्चर्यानं थक्क होशील.

मोहनराव — मला कल्पना नव्हती, की तुमच्यासारखे जे लब्धप्रतिष्ठित लोक आहेत, त्यांच्या ठायीं परमावधीचा निर्लज्जपणा असतो म्हणून. विद्याधर, तूं दाखविणार आहेस तो चमत्कार मी पाहीन, पण दुसराहि एक चमत्कार मी दाखवीन तो पाहण्याची तयारी कर.

[सुहासिनी आंतून धावत येते व ओरडते 'मोहनराव'. मंजुळा पाठीमागे दारांत उभी आहे असा देखावा. पडदा पडतो.]

अंक दुसरा समाप्त

---

# ३

[बॅरिस्टर विद्याधर यांचा दिवाणखाना. भिकाजीपंत आणि मोहन बोलत आहेत असा देखावा.]

मोहनराव — भिकाजीपंत, मला आता मन्दाला भेटलंच पाहिजे. एक एक क्षण लाखाचा चाललाय !

भिकाजीपंत — पण असं झालं तरी काय ?

मोहनराव — सुहासिनी थोड्या वेळांत इथं येईल. याची पूर्वसूचना मन्दाला दिलीच पाहिजे.

भिकाजीपंत — तुम्हांला कसं कळलं ?

मोहनराव — तुमच्या मंजुळेकडून. मला रस्त्यांत भेटली होती. तीहि इतक्यांत इथं येणार आहे.

भिकाजीपंत — हे तर आगींत तेल ओतल्याप्रमाणं होणार आहे. प्रकरण मोठं हातघाईवर आलेलं दिसतं. काल साहेब आले नेहमीपेक्षा उशीरा. मी कधी इतका वेळ थांबत नाहीं. पण काल मुद्दाम रेंगाळलों. साहेबांना उशीर झालेला पाहून ताई-साहेब गरम झाल्यासारख्या दिसत होत्या. त्यांनी सामानाची आवराआवर चालविली होती. त्यांचा तर घर सोडण्याचा विचार दिसतो. एकंदर परिस्थिति तर चमत्कारिक उत्पन्न झाली आहे. मला भीति वाटते ती ही की यांचा संसार हा असा न मोडो म्हणजे झालं !

मोहनराव — आणि आता मोडायचा तो काय बाकी राहिला आहे ! मन्दा शिकलेली आहे म्हणून आहे जोरांत आणि बाहेर

जाण्याच्या गोष्टी बोलूं शकते. ती घर सोडून गेली काय किंवा न गेली काय संसार आटपलाच आता.

भिकाजीपंत — तो ज्याच्या त्याच्या नशिबाचा प्रश्न! कोणाचाहि संसार जमवून द्यावा, वेलीला मांडवावर चढवून द्यावी असं म्हणतात. पण हें तर भलतंच होऊं पाहत आहे! आणि त्यांत खापर फुटणार माझ्या माथीं!

मोहनराव — अहो, असं काय म्हणतां? यांत तुमचा काय संबंध? तुम्हीं मंदाला जें कांही सांगितलंत त्यांत कांही खोटं होतं का? गोष्टी करणारांना लाज वाटत नाही मग बोलणारांनी तरी ती कां धरावी? विद्याधराचं पाऊल दिवसेंदिवस पुढच पडत आहे. सुहासिनीच्या घरीं तो अगदी घरच्यासारखा आरामांत असतो.

भिकाजीपंत — त्यांचा इतका चांगला लौकिक....

मोहनराव — अहो, त्यांचा लौकिक एकपत्नीव्रताबद्दल थोडाच होता? दोन बायका असल्या म्हणजे बॅरिस्टर थोडाच वाईट होतो! सुहासिनीमुळ लोकांची ये-जा मोठ्या प्रमाणावर होईल. त्यामुळ प्रॅक्टिस वाढेलसुद्धा. मन्दाला सांगा मी आलों म्हणून.

[भिकाजीपंत जातात.

मोहन एकटाच उभा राहतो. जिवाजी येतो.]

जिवाजी — मोहनराव, अक्शी खरं सांगतुया, म्यां तुमचं अन् भिकाजी-पंतदादाचं समदं बोलनं ऐकलया! ती बया खरंच येणार व्हय? मीबी घर सोडुनश्यान् जाईन म्हनतुया!

मोहनराव — कां रे?

जिवाजी — हत! म्यां अब्रून दीस काढले पगा! ताईसायबांनी कधी हां नाय म्हटलं! ही बया सायबास्नी नाय इचारनार तर

मला इचारनार व्हय? एक रोज काय झालं म्यां दोन शिगरेटी लांबवल्याती, साब अक्शी इंगळावानी लाल झाल्याती! नोकरीच गेली व्हती! ताईसायबांनीच मस्नी वांचवलं पगा!

मोहनराव — अरे, मी तुझ्या ताईसाहेबांना ओळखत नाहीं का? पण काय रे? आणखीन् काय काय लांबवलंस?

[मंदा व भिकाजीपंत प्रवेश करतात. जिवाजी जातो.]

मन्दा, एका महत्त्वाच्या कामासाठी मी आलों आहें.

[मन्दा भिकाजीपंताकडे पाहते. ते जातात.]

मन्दाकिनी — काय?

मोहनराव — या घरांत आता तुझं कसं होणार?

मन्दाकिनी — कांही कमीजास्त ऐकलंस कीं काय?

मोहनराव — ऐकलं एवढंच नव्हे तर पाहिलं देखील.

मन्दाकिनी — (अधीरतेने) कुठ? केव्हा?

मोहनराव — सुहासिनीच्या घरीं. तुझ्याकरिता म्हणून मी आज तिथ गेलों, तर त्यांचा आंतल्या खोलींत घरच्यासारखा चहा चालला होता. माझं आणि विद्याधराचं कडाक्याच भांडण झालं. मला नाही सताप आवरला!

मन्दाकिनी — तिच्या घरीं!.... मोहन.... तुम्ही एवढे घरंदाज आणि तिच्या घरीं जाऊन कैकाड्यासारखे भांडलांत? आश्चर्य आहे!

मोहनराव — आता मी इथ आलों आहें हे जर विद्याधराला कळलं तर तो आकाशपाताळ एक करील. दुपारच्या प्रसंगानंतर मी इथ वास्तविक येऊं नये, पण जमल्यास तुझ्या उपयोगीं पडावं म्हणूनच केवळ मी आलों आहें.

मन्दाकिनी — पण तूं मला काय सांगणार होतास?

मोहनराव — मी कांही तरी सांगण्याकरितां आलों खरा परंतु पुनः

विचारांत पडलों.

मन्दाकिनी – काय सांगायचं ते चट्दिशी सांगून टाक. मला माझं दुर्दैव पुरं दिसूं लागलं आहे. वास्तविक, विद्याधरांच्या विरुद्ध कोणी कांहीं सांगूं लागला तर तें मी ऐकूं नये. आजपर्यंत कोणालाहि ब्र काढूं दिला नाहीं. परंतु आज सर्वच परिस्थिति पालटली आहे. तेव्हा तुला जें कांहीं सांगायचं आहे तें निःसंकोचपणं सांग.

मोहनराव – मी जायला आणि त्यांचं भाषण रंगांत यायला एकच गांठ पडली. मी गेलों तेव्हा विद्याधरने जे शब्द उच्चारले, ते ऐकतांच कानांत शिशाचा रस ओतावा, अशी माझी स्थिति झाली. ते शब्द म्हणजे – मला पक्के आठवतात ते – "सुहासिनी, तुला इथ एकटं सोडून जाण्याचं फार जिवावर येतं, पण कांहीं तास तुला दूर राहणं प्राप्त आहे...."

मन्दाकिनी – अगदीं खोटं !

मोहनराव – काय ? जी गोष्ट कानांनीं प्रत्यक्ष ऐकली ती खोटी ?

मन्दाकिनी – मोहन, मला क्षमा कर. विद्याधरांच्याबद्दल माझ्या अंतःकरणांत किती प्रेम सांठवलं आहे, याची कोणाला कल्पना येणार नाहीं आणि त्यामुळ मी कधी कधी आजची परिस्थिति पार विसरून जात. पण मोहन, इतक्या निर्लज्जपणं विद्याधर कधींहि बोलणं शक्य नाहीं !

मोहनराव – मन्दा, यांत असत्याचा एक अंशहि नाहीं. एखादा शब्द कमी असेल, पण जास्ती नाहींच नाहीं.

मन्दाकिनी – पुढं ?

मोहनराव – मला पाहतांच विद्याधरचा चेहरा खग्रास ग्रहण लागल्याप्रमाण झाला. त्यान ताबडतोब तिचा निरोप घेतला व खालीं

मान घालून चालता झाला, सुहासिनी माझ्याशीं बोलायला तयार होईना. याचा अर्थ एकच की, तिच्या जाळ्यांत विद्याधर पूर्णपणं अडकला. एरवी, अशा रीतीन माझा अपमान करण्याची तिची काय प्राज्ञा होती ?

मन्दाकिनी – (विचाराच्या तंद्रींत)—मोहन, 'थोडे तास दूर राहणं प्राप्त आहे' असं विद्याधर म्हणाले ना ? काय बरं त्याचा अर्थ असेल ? का एकदोनदा म्हटल्याप्रमाण ते तिला आज घरीं आणणार आहेत ? काल रात्रीपासून त्यांचींहि मनःस्थिति कांहीं चांगली नाही.

मोहनराव – याशिवाय दुसरा अर्थ मला तरी दिसत नाही. असं मोघम कशाला ? सुहासिनी इतक्यांत इथ येणार आहे.

मन्दाकिनी – दुर्दैवाचं माप पुरेपूर अजून भरलं नव्हत तें आज भरणार एकूण...मींहि माझं उत्तर चांगलं खणखणीत योजून ठेवलं आहे म्हणा !

मोहनराव – काय तें ? तुझा कांहीं कमीजास्त करण्याचा विचार तर नाहीं ना ?

मन्दाकिनी – मी कांहीं जीवबीव देणार नाहीं !

मोहनराव – म्हणजे तूं घर सोडणार असं तर ! बाकी कोण स्वाभिमानी स्त्री अशा रीतीन राहील ? नवऱ्यान बायको टाकल्याचीं उदाहरणं पुष्कळ आहेत; परंतु बायकोन नवरा टाकल्याचं हें पहिलंच उदाहरण होईल !

मन्दाकिनी – मोहन, हें सर्व टाळण्याला कांहीं उपाय नाही का ?

मोहनराव – उपाय कां नाही ?

मन्दाकिनी – कोणता ?

मोहनराव – पण तुला तो पटणार नाही. कारण त्यांत माझ्याकड

एक प्रकारचा स्वार्थत्यागाचा वांटा येतो. इतका स्वार्थत्याग मीं केलेला तुझ्या मानी मनाला पटणार नाही.

मन्दाकिनी — साधारण परिस्थितींत मीं कोणाचेहि उपकार स्वीकारले नसते, इतकंच नव्हे तर असं कोणीं सुचविलं असतं तर मला राग आला असता; पण आज कोणाचेहि उपकार एखाद्या दीनाप्रमाण स्वीकारायला मी तयार आहें. इतकी माझी भीडमुरवत, लाजलज्जा मीं गुंडाळून ठेविली असतांना तुला संकोच वाटण्याचं कारण नाही.

मोहनराव — मन्दा, विद्याधराचं हेंच म्हणणं ना की सुहासिनीची त्याला नीट व्यवस्था लावायची आहे म्हणून? ठीक, सुहासिनीच्या आईच्या मनांत तिचं सुखदुःख माझ्यावर सोपविण्याचा विचार होता. तेव्हा त्या इच्छेनुरूप विद्याधर जर सुहासिनीची व्यवस्था करण्यास तयार असेल तर मी सर्व जबाबदारी घेण्यास तयार आहें.

मन्दाकिनी — याचा अर्थ तूं तिच्याशीं लग्न लावायला तयार आहेस असाच ना?

मोहनराव — पण इतकं स्पष्टीकरण कशाला पाहिजे?

मन्दाकिनी — विद्याधर जर वळणार असले तर त्यांना इतकं आश्वासन दिल्याशिवाय भागणार नाही. त्यांचा स्वभाव मला माहीत आहे.

मोहनराव — तो कोणतीहि गोष्ट मानणार नाही याची मला खात्री आहे. तुझ्याकरिता वाटेल तें करावयास मी तयार आहें. तुला वाटेल तें सांग. माझी ना नाही. ठीक आहे.

[मोहन जातो. विद्याधर दरवाजांत दिसतो. एक आंत येतो व दुसरा बाहेर जातो.]

विद्याधर — आज बहिण–भावांचं फार हितगुज चाललं होतं ?

मन्दाकिनी — दुःस्थितींत असलेल्या माणसाची वाटेंतील वाटसरूला देखील दया येते, तर मग भावाला कां नाही येणार ?

विद्याधर — अस्सं ! तेंहि खरंच. मन्दा, सध्या परिस्थितिच इतकी चमत्कारिक झाली आहे की माझे हातपाय बांधल्यासारखे झाले आहेत. नाही तर मोहनला या घरचा रस्ताच बंद केला असता. आणखी थोडा वेळ माझ्या कोणत्याहि कृत्याचा विपर्यास माझ्याच हातून होऊं नये अशी इच्छा असल्यामुळ मला स्वस्थ बसणं भाग आहे. विशेषतः माझ्या प्रत्येक कृत्याशीं तुझं सुखदुःख निगडित असल्यामुळ मला फारच बेतान घ्यावं लागतं.

मन्दाकिनी — म्हणजे माझ्या सुखदुःखाची इतकी काळजी लागली आहे तर ! त्या जुन्या बायका म्हणतात, शेळी जाते जिवानिशीं आणि खाणारा म्हणतो वातड, त्यांतलाच प्रकार नाही तर काय ?

विद्याधर — मन्दा, तुझ्या मनांत कुलशीलाच्या, घरंदाजपणाच्या कल्पना इतक्या खोल रुजल्या आहेत की आजपर्यंत केवळ तुला दुःख होईल म्हणून मीं या बाबतींत उत्पन्न झालेल्या मतभेदाची चर्चा केली नाही. आता तर त्यांत संशयाची भर पडली आहे. स्पष्ट बोलण्याची आता वेळ आली आहे. चल मी तुझी खात्री पटवून देतों किंवा तूं माझी खात्री पटवून दे.

मन्दाकिनी — इतकी साधी गोष्ट ! बरं समजा, मी तुमची खात्री पटवून दिली तर तुम्ही ती पटवून घ्याल ना ?

विद्याधर — कां नाही ?

मन्दाकिनी — पण जाऊं द्या ! उगीच कशाला ? विषाची परीक्षा पाहूं नये म्हणतात तेंच खरं !

विद्याधर – अगदीच वेडी आहेस झालं ! अग, विषाची परीक्षा एकदा झाली की त्याचा औषधासारखा उपयोग होतो. म्हणून म्हणतों एकदा परीक्षा होऊंदेच.

मन्दाकिनी – ठीक आहे; होऊंच द्या तर दोन हात ! ही वेळ केव्हा तरी येणार होतीच ! मीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरं 'हो' 'नाहीं' या शब्दांत द्या. माझ्याशीं वादविवाद करून बाजू माझ्यावर उलटविण्याच्या भानगडींत पडूं नका. आहे कबूल ?

विद्याधर – (हसत) कबूल. तूं प्रश्न विचार. त्यांच्या लांबीरुंदीचा विचार न करतां तूं सांगितलेल्या एकाक्षरी किंवा द्यक्षरी मंत्राचा उच्चार करीन. मग तर झालं ?

मन्दाकिनी – अलीकडे तुमचं सुहासिनीकडे जाणं येणं मर्यादेबाहेर वाढलं आहे कीं नाही ?

विद्याधर – नाही.

मन्दाकिनी – जाणं येणं वाढलं नाही ?

विद्याधर – हो.

मन्दाकिनी – मग मघाशी कां नाही म्हणालांत ? तुम्ही माझी चेष्टा मांडलीय होय ?

विद्याधर – तूं मला अधिक बोलण्याची बंदी करतेस तेव्हा जे दोन शब्द बोलण्याची परवानगी दिली आहेस त्यांचाच उपयोग करून मनांतला आशय व्यक्त करायला नको का ? जाणं येणं वाढलं आहे पण तें मर्यादेबाहेर नाही इतका अर्थ व्यक्त करण्यासाठी 'हो' आणि 'नाही' या दोन्ही मंत्रांचा उपयोग करावा लागला. तूं साधे प्रश्न विचार. मी पाहा कसं सरळ उत्तर देतों तें !

मन्दाकिनी – तुम्हांला अलीकडे तिच्याविषयी परकेपणा वाटेनासा

झाला आहे; तिला एकटं सोडून येण्याचं जिवावर येतं. काहो ! तुम्हांला समाजसेवासंघाचे चिटणीस म्हणून चहाचीं आमंत्रणंहि येऊं लागलेलीं दिसतात ! उद्या अॅट होम (At Home) चीं येऊं लागतील व मग घरच्यापेक्षा बाहेरच तुम्हांला अॅट होम (At Home) वाटेल !

विद्याधर — (एकदम लक्षांत आल्यासारखें) काय म्हणालीस ? मन्दा, हें तुला कोणीं सांगितलं ?

मन्दाकिनी — कोणीं सांगण्याचा प्रश्न कसा उत्पन्न होतो ? मीं आपलं सहज विचारलं. इतकं झोंबण्यासारखं तें काय आहे त्यांत ?

विद्याधर — मन्दा, हें सर्व तुला मोहनन सांगितलं ना ? हो, त्यानच. काल मी निघायला व तो यायला एकच गांठ पडली.

मन्दाकिनी — का तो आला म्हणून आपण पळ काढलात ?

विद्याधर — बहिणभावाचं हितगुज चालतं तें हेंच वाटतं ?

मन्दाकिनी — हो. हेंच चालतं.

विद्याधर — मोहनन आपल्या जीविताचा नाश करून घेतलाच आहे. आता तो तुझ्याहि जीविताचा नाश करूं पाहत आहे. दुसरं काय ?

मन्दाकिनी — विद्याधर, मोहन वाईट असेल—नाही—तो तसा आहेहि. परंतु माझ्या बाबतींत तरी त्याचं मन शुद्ध आहे. माझ्याकरिता तो वाटेल तो स्वार्थत्याग करायला तयार होईल. तुम्ही देखील ऐकून थक्क व्हाल.

विद्याधर — थक्क होण्याचा पुढचा प्रश्न कशाला ? आजच मी थक्क झालों आहें. मोहनची तरफदारी करतांना तुला पाहून कोण थक्क होणार नाही ?

मन्दाकिनी — विद्याधर, मी एक गोष्ट सुचविणार आहें व तुम्ही

पूर्वीचेच विद्याधर असाल तर तुम्हांला ती गोष्ट पटली पाहिजे.

विद्याधर – (हसून) मी पूर्वीचाच आहें आणि तूं जर पूर्वीचीच असशील तर वाटेल ती गोष्ट तूं सुचविणार नाहीस व मला नाही म्हणावयास भाग पाडणार नाहीस. मी पूर्वीचाच आहें याची मला खात्री आहे. तुला स्वतःबद्दल तशीच खात्री असूं दे.

मन्दाकिनी – विद्याधर, सुहासिनीचं आपण कोणाशीं लग्न लावून दिलं तर कसं ?

विद्याधर – मी त्याच विचारांत आहें. पण तिच्याशीं आजच कोण विवाह करणार ?

मन्दाकिनी – आणि कोणी तयार झाला तर ?

विद्याधर – त्यापेक्षा अधिक काय पाहिजे ?

मन्दाकिनी – मग मी एक नांव सुचवूं का ?

विद्याधर – खुशाल.

मन्दाकिनी – मोहन काय वाईट आहे ?

विद्याधर – कोण ? मोहन ? छे ! छे ! शक्य नाही. सुहासिनीच तयार होणार नाही. पण मन्दा, ही कल्पना तुझी नाही.

मन्दाकिनी – कारण ?

विद्याधर – कोणतीहि समंजस स्त्री एखाद्या मुलीकरिता मोहन इतक्या स्वच्छंदी वृत्तीच्या मुलाचं नांव सुचविणार नाही. ही कल्पना मोहनचीच दिसते.

मन्दाकिनी – मोहन केवळ माझ्याकरिता ही गोष्ट करायला तयार झाला आहे. एरव्ही त्याचं मन तिच्या बाबतींत अगदी विट-लेलं आहे.

विद्याधर – मग त्यांना एकत्र आणून फायदा तो कोणता. विवाह

हा सुखासाठी का दुःखासाठी? जाणूनबुजून आगींत शिरण्याचा हा प्रकार!

मन्दाकिनी – पण मोहन म्हणतो की तिच्या आईची तशी इच्छा होती.

विद्याधर – तिच्या आईची गोष्ट कशाला पाहिजे? ती महामूर्ख होती ही गोष्ट जगजाहीर नाही का? मरणोन्मुख असतांना मोहनचं तिकडे जाणंयेणं सुरू झालं. बिचारीला वाटलं पोरगी कोणावर तरी सोपविली पाहिजे. काय वाईट आहे? सुहासिनीलाहि कोणाची तरी मदत आईच्या आजारांत पाहिजे होतीच. ती मूग गिळून स्वस्थ होती. माझी ओळख झाल्यापासून मी पाहात आहें की तिच्या मनांत मोहनसंबंधी तिटकाराच आहे. शिवाय मोहन लग्न करायला तयार होईल असं वाटत नाही. जिच्याशीं विवाह करायचा तिच्याविषयी मनांत आदर पाहिजे. तो आहे का त्याच्या मनांत? तूंच म्हणालीस ना त्याचं मन विटलेलं आहे म्हणून?

मन्दाकिनी – म्हणजे तुम्ही सुहासिनीच्या विवाहाला प्रतिकूल आहांत असंच ना?

विद्याधर – पुनः विपर्यास! मी तिच्या विवाहाल प्रतिकूल नाहीं. तूं सुचविलेल्या या विवाहाच्या मात्र मी विरुद्ध आहें. परिस्थितीमुळ आपल्या जीविताशीं सुहासिनीचं जीवित निगडित झालं आहे.

मन्दाकिनी – आपल्या नव्हे, तुमच्या.

विद्याधर – (दुर्लक्ष करून) तेव्हा जी जबाबदारी अंगावर येऊन पडली आहे, ती योग्य रीतीन पार पाडणं आपलं कर्तव्य आहे. (जरा थांबून) मन्दा, तुला कितीतरी गोष्टी सांगायच्या आहेत. पण तूं मला बोलूंच देत नाहींस. तूं जरा मन शान्त

कर. आपल्या आयुष्यांतील एक अलौकिक गोष्ट आज घडून येणार आहे. मी हा आलोंच. (जिवाजी प्रवेश करतो.) काय ?

जिवाजी — ह्यो नानासाहेबांच्याकडून चिट्ठी आली हाय. (विद्याधर चिठ्ठी घेतो. वर मन्दाचें नांव पाहून तिला ती देतो व 'मी हा आलोंच' म्हणत बाहेर पडतो. मन्दा चिठ्ठी वाचते.)

मन्दाकिनी — भिकाजीपंतांना पाठवून दे. (जिवाजी जातो. मन्दा पुनः चिठ्ठी वाचते व संतापते. भिकाजीपंत प्रवेश करतो.) ही पाहा नानासाहेबांची चिट्ठी.

भिकाजीपंत — काय म्हणतात ?

मन्दाकिनी — "धीर धर. सर्व कांही ठीक होईल." भिकाजीपंत, तुम्ही तावडतोब नानासाहेबांच्या कडे जा आणि त्यांना सांगा की सुहासिनीचा पाय घरांत पडला की माझा पाय बाहेर पडणार. तावडतोब भेटायला या.

भिकाजीपंत — ताईसाहेब !

मन्दाकिनी — भिकाजीपंत, तुम्ही काय बोलणार मला माहित आहे. मी हें आवर्डान का करीत आहे ? संसाराला सुरवात होण्या-पूर्वीच शेवट ! नुसती कल्पनाच किती भयंकर वाटते ! पण भिकाजीपंत, मी इथ राहून तरी काय करूं ? ज्या ठिकाणीं मीं फुलं वेचिलीं त्या ठिकाणीं आता खडे वेच-ण्याची पाळी आली आणि हें मी उघड्या डोळ्यांनी कसं सहन करूं ?

भिकाजीपंत — पण ताई साहेब, अजूनहि सर्व ठीक होईल. पण त्या करिता तुम्हांला इथ घरीं असलं पाहिजे.

मन्दाकिनी — पण आता हें आपलं घर राहिलं कुठ ? ज्या ठिकाणीं

शान्ति आणि प्रेम यांचा निरंतर अभाव आहे त्या ठिकाणाला घर कोण म्हणेल ? भिकाजीपंत, माझी घराची कल्पना किती रमणीय होती ! जगांतील सर्व पावित्र्य, सौंदर्य व सौजन्य यांचं एकमेव वसतिस्थान म्हणजे 'घर'. भिकाजीपंत तुम्ही येथून जा कसे ! निष्कारण मला मोहांत पाडूं नका. जा म्हणतें ना ! (भिकाजीपंत निघणार तोंच) — माझीं कांही पत्रं टाकायचीं आहेत आणि एक तार करायची आहे. पण नको. इतकीं महत्वाचीं पत्रं मी कोणावरहि सोपविणार नाहीं. तुम्ही जा. (भिकाजीपंत रेंगाळतो.) जिवाजी....जिवाजी ....जिवाजी.... (जिवाजी प्रवेश करतो.) जिवाजी, मी जरा बाहेर जाऊन येतें. कोणी आलं तर थांबवून घे. मी ही आलेंच. (घाईने बाहेर जाते.)

जिवाजी — भिकाजीपंत, ह्यो काय चाललं हाय घरांत ? आज ताईसाहेबांनी तर गांवाला जायासाठी बांधाबांध केली हाय !

भिकाजीपंत — चूप. तुला काय करायचं ? आज घराला आग लागली आहे. तमासगिरांनी आपली मौज पाहावी.

जिवाजी — हें त्या बयामुळच असल.

[भिकाजीपंत दरवाज्याकडे पाठ करून उभा आहे. मंजुळा येते.]

मंजुळा — जिवाजी, साहेब आहेत का ?

भिकाजीपंत — (एकदम वळून) नाहीत.

जिवाजी — भिकाजीपंत, ह्यो नाय पसंत आपनास्नी. मी इच्यारतों, परश्न तुमास्नी केला कीं मस्नी ? मंजुळामावशी, इसरून जा ते म्हंगाले तें. ध्येनामंदी नको घेऊं. मी सांगतुंया, साब घरामंदी नाय ती. आता मी म्हंगतों चालूं द्या तुमचं साटंलोटं.

भिकाजीपंत — जिवाजी, तूं बराच फाजिल होत चाललास ?

जिवाजी – त्याल्ली कोन काय करनार ? वाढत्या वयाबरोबर आनखीं काय व्हनार ? [जिवाजी जरा पलीकडे जातो.]

मंजुळा – सुहासिनी म्हणाली, ते नसतील तर येईपर्यंत थांब व मग मला सांगायला ये.

भिकाजीपंत – सुहासिनी येणार ती इथ राह्यला का नुसती समाचाराला ?

मंजुळा – शहाणी असेल तर समाचाराला येऊन कायमची राहील, किंवा राह्यला येऊन कायमचा समाचार घेईल ! पोरगी अगदीच नाही फुकट गेली !

भिकाजीपंत – आज दुपारीं काय झालं ?

मंजुळा – चांगली झाली की रडारडी, भांडाभांडी ! मोहनराव आणि तुमचे साहेब असे हमरीतुमरीवर आले की कांही विचारूं नका. एखाद्या बाईवरून पुरुष भांडूं लागले की मला वाटतं आहे जगण्याजोग कांही.

भिकाजीपंत – मग ?

मंजुळा – पुष्कळ पुष्कळ झालं; पण मला अधिक नाही कळलं. सुहासिनीची आई गेल्यापासून मी नुसती नांवाचीच मावशी झालें आहें. जें करायचं ते विद्याधरसाहेबांना विचारून करते ती.

जिवाजी – भिकाजीपंत, नानासाहेबाकड तुमाल्ली जायचं हाय. इसरलांत जनुं.

भिकाजीपंत – मंजुळामावशी, मला तर आता गेलंच पाहिजे. थांबा थोडा वेळ. साहेब येतीलच इतक्यांत. [भिकाजीपंत जातो.]

जिवाजी – मंजुळामावशी, ह्यो काय धरमशाळा हाय म्हून मुक्कामाल्ली हत येतां व्हय ? तुम्हाल्ली काय वाटतुया ? ह्यो काय येटिंगरूम

हाय ? काय वाटतुया ? अं– अं– अं– त्या तुझ्या सुहासिनीकडे मी अक्षी ढुंकून बी पहाणार नाय. काय सायबाल्ला भुरळ घातलिया देवाल्ला माहित !

मंजुळा – कोठावळ्याचं कां पोट दुखतं ?

जिवाजी – त्याल्ला मानुसकी हांय म्हून ! असं कांही व्हनार माहित असतं तर पहिल्यापासून पाय नसता ठेवूं दिला हत. आमच्या ताईसाहेब देवमानुस हैती. ग्वाड– लई ग्वाड.

[अतिशय थकलेली अशी मन्दा प्रवेश करते.]

मन्दाकिनी – विद्याधर आले का ?

जिवाजी – नाही, त्यांच्याच शोधाला मंजुळामावशी आली आहे.

(मन्दा तिच्याकडे प्रश्नार्थक पाहते.)

मंजुळा – सुहासिनीबाई म्हणाल्या की विद्याधरसाहेब आहेत का पाहून ये. नसतील तर थांब व आल्यावर मला बोलवायला ये. म्हणून मी आलें.

मन्दाकिनी – ठरलेल्या वेळेला तूं सुहासिनीबाईंना घेऊन ये. विद्याधर तोपर्यंत येतील परत. ते चुकायचे नाहीत. आज तर नाहीच नाही.

मंजुळा – मग मी जाऊं ?

मन्दाकिनी – जा. जिवाजी, भिकाजीपंत आले का पाहा. येतांच त्यांना तावडतोब पाठवून दे. (स्वस्थ खुर्चीवर बसते.)

[विद्याधर प्रवेश करतो.]

विद्याधर – मन्दा ! मन्दा ! (उत्तर येत नाहींसे पाहून तिच्या स्कंधावर हात ठेवतो. ती जागी होते. ताडकन् उठून दूर उभी राहते. विद्याधर गंभीर होतो. एकमेकांकडे पाहत तटस्थ उभीं राहतात.) मन्दा, मी तुझ्याशीं कांही गोष्टी स्पष्ट बोलण्यासाठी आलों आहें.

मन्दाकिनी — आता बोलण्याची गरज कुठं उरली आहे? तुमचा मार्ग भिन्न, माझा मार्ग भिन्न. तुम्ही आपल्या मार्गानं स्त्री-जातीचा उद्धार करा, मी आपल्या मार्गानं आत्मोद्धार करून घेईन!

विद्याधर — पण इतका आततायीपणा करण्याचं कारण काय?

मन्दाकिनी — विद्याधर, या तुमच्या धाष्टर्याला काय म्हणावं हेंच कळत नाही. या आततायीपणाचं कारण मला विचारतां? जणू कांही अगदी माहितच नाही अं!

विद्याधर — हें कांही तरी भलतंच होऊं पाहत आहे! आज सकाळ-पासून तुझी चाललेली धडपड माझ्या लक्षांत आली परंतु तुझ्याशीं त्यासंबंधानं बोलण्याइतकी फुरसदच मिळाली नाही.

मन्दाकिनी — फुरसद कशी मिळणार? नव्या बाईसाहेबांच्या आगम-नाची तयारी करण्यांत वेळ सापडेल तेव्हा ना?

विद्याधर — मन्दा, काय हें? एखाद्या अडाणी बाईला हें बोलणं शोभलं असतं. अग, डोळे असून अशी आंधळी कां होतेस?

मन्दाकिनी — डोळे आहेत म्हणूनच मला सर्व कांही दिसतं. कान आहेत म्हणून सर्व कांही ऐकूं येतं. मी अशिक्षित असतें तर डोळे मिटून सर्व कांही न दिसल्यासारखं केलं असतं पण मी आंधळी नाहीं व अशिक्षितहि पण नाहीं. उघड्या डोळ्यांनी प्राण जात नाही म्हणतात मग त्यापेक्षाहि हें भयंकर संकट मी उघड्या डोळ्यांनी कसं सहन करूं?

विद्याधर — म्हणजे? मला सोडून जाण्याचा निश्चय केलास कीं काय? मन्दा....

मन्दाकिनी — तुम्हीं मला सोडलंत तरी सुद्धा तुमच्या पाठोपाठ लतकोडग्याप्रमाणं यावं इतकी स्वाभिमानशून्यता अंगीं नसल्या-

मुळ मला माझा मार्ग पाहिला पाहिजे. माझा बेत नक्की झाला. तुमच्या येण्याचीच मी वाट पाहत होतें. घर सोडतांना घरच्या मालकाचा निरोप घ्यावा ही रीत आहे, त्याकरिता मी थांबलें होतें. शिवाय मला तुमचे आभार मानायचे आहेत. आजपर्यंत तुम्हीं मला अत्यंत प्रेमानं वागविलंत; प्रेम कशाला म्हणतात याचा अनुभव आणून दिलात. कांही काळ तरी प्रेमाच्या आनंदांत मी जगाला विसरलें, हें कांही थोडं झालं नाही. दोन वर्षं स्वप्नांत होतें म्हणा पण तें स्वप्न गोड होतं आणि त्याचं श्रेय सर्वस्वीं तुम्हांला आहे.

विद्याधर — मन्दा.... मन्दा.... (धावत जाऊन तिचा हात धरतो.) तूं जाणार कुठं ? आणि मी मग काय करूं ?

मन्दाकिनी — आपल्या नव्या जोडीदारणीबरोबर संसार ! (विजयी मुद्रेनं त्याच्याकडे पाहते.)

विद्याधर — पुनः तेंच ! मन्दा, मी कोणतं दिव्य करूं म्हणजे तुझ्या मनांतला हा संशय नाहींसा होईल ?

मन्दाकिनी — सुहासिनीशीं संबंध ठेवूं नका.

विद्याधर — तें आता कसं शक्य आहे ? कालपासून ज्या ज्या कांहीं नवीन गोष्टी....

मन्दाकिनी — त्या गोष्टी ऐकण्याची माझी इच्छा नाहीं !

विद्याधर — पण माझी सांगण्याची इच्छा आहे.

मन्दाकिनी — मी त्या ऐकणार नाहीं (आपल्या कानांवर हात ठेवते. थोडा वेळ स्तब्धता.)

विद्याधर — मन्दा, असं वेड्यासारखं वर्तन करून तूं निष्कारण आपल्या संसाराचं मातेरं करीत आहेस. तुझ्याशीं बोलण्याची संधि मी कालपासून पाहत आहें. पण ती मिळूं नये असाच

योगायोग होता आणि तुला एकंदर हकीकत कशी सांगावी याचा मी विचार करीत होतों; तुला एकदम सर्व सांगावं तर तुला धक्का बसेल म्हणून भीत होतों.

मन्दाकिनी — पाप आणि भीति सख्खीं भांवडं आहेत. आणि आता धक्का बसायचा तो काय राहिला आहे ? सर्व नाश झाला.... विद्याधर, हृदयाचा चक्काचूर झाला हो चक्काचूर झाला ! आणि तुम्ही कसं सांगूं याचाच विचार करीत बसलां आहांत !

विद्याधर — स्टे परटर्ब्ड स्पिरिट (stay perturbed spirit). माझं म्हणणं तर ऐकून घेशील ? अशी पिसाटल्यासारखी काय करतेस ?

मन्दाकिनी — मला ऐकून तरी करायचं आहे ? माझा जाण्याचा निश्चय झाला आहे तो कालत्रयीं फिरणार नाही.

विद्याधर — एकदा सोडून दहादा जा. पण जाणं आवश्यक आहे का याचा विचार कर. साप साप म्हणून दोरी बडवत बसण्याचा मूर्खपणा मात्र करूं नकोस बरं ! तूं जायचा निश्चय केलास ना ? ठीक आहे. पण माझ्याकरिता तो निश्चय उद्यावर ढकल.

मन्दाकिनी — मी आणि सुहासिनी एका घरांत राहणं शक्य नाही !

विद्याधर — एक एक गोष्ट तुला कशी सांगावी याचा मी विचार करीत असतों आणि मागचापुढचा विचार न करतां या साऱ्या गोष्टी तुला सांगतो कोण ?

मन्दाकिनी — (उपहासाने हसत) मला एक कर्णपिशाच्च वश झालं आहे त्यान दिली ही बातमी.

विद्याधर — निःसंशय तें पिशाच्चच असलं पाहिजे ! एरव्हीं तुला ही बाधा झालीच नसती ! (भिकाजीपंत प्रवेश करतो.)

भिकाजीपंत — साहेब. (विद्याधर टवकारून पाहतो.)

मन्दाकिनी — अगोदर माझं काम! काय म्हणाले नानासाहेब?

भिकाजीपंत — ते यायला निघालेच आहेत.

विद्याधर — एकूण तुझं कर्णपिशाच्च तें हें! (भिकाजीपंतास) भिकाजीपंत, चांगले खाल्ल्याघरचे वासे मोजतां! जुनी ओळख म्हणून तुम्हांला जवळ केलं, विश्वास ठेवला, त्याचा चांगला मोबदला दिलात!

भिकाजीपंत — साहेब, बाईसाहेबांच्यासारखी साध्वी स्त्री मिळाली असतां त्या बाजार...

विद्याधर — चूप! बदमाश! (आपल्या कपाळावर हात मारतो.) भिकाजीपंत, चालते व्हा. मी जें करीत आहें तें समजणं तुमच्या बुद्धीच्या आवाक्याबाहेरचं आहे. कुजक्यानासक्या रूढीवर पोसलेल्या पोळांना स्त्री म्हणजे केवळ उपभोग्य वस्तुच वाटायची. भिकाजीपंत, चालते व्हा म्हणतों ना! सुहासिनी पांच दहा मिनिटांत येईल, मग या काय मौज होते ती पाहायला. (भिकाजीपंत जातो.) हो, हें पाहा. आणि मोहनलाहि घेऊन या. मन्दा, तुझा जाण्याचा निश्चय असेल तर तूं जा. पण माझी एक शेवटची इच्छा तूं मानशील का?

मन्दाकिनी — मी इथ राहायला तयार नाहीं.

विद्याधर — तूं इथ राहा असं मी म्हणत नाहीं. परंतु तूं आणि सुहासिनी यांनी दहा मिनिटं एकमेकांशीं बोलून मग विभक्त व्हावं अशी माझी इच्छा आहे. सुहासिनीच्या आईचं विल (will) आपल्या इथ वाचलं जावं अशी तिच्या आईची इच्छा होती. मृत्युपत्राचं वाचन होतांच तूं घराबाहेर पडायला मोकळी आहेस. मग मी आणि माझं नशीब पाहून घेऊं.

मन्दाकिनी — आता का नशीबाला दोष देतां? पण मृत्युपत्र मला

ऐकण्याची इच्छा नसली तर ?

विद्याधर — तर तो एक निर्दयपणाचा प्रकार होईल. मन्दा, मी तुला इतकी निर्दय होऊं देणार नाहीं. सुहासिनी इथ येईपर्यंत तूं हें घर सोडतां कामा नयेस.

मन्दाकिनी — म्हणजे हा मला एक बंदीवासच झाला !

विद्याधर — हो. अगदी तसंच. मी तुला या प्रसंगाकरिता तयार करण्याची संधि पाहत होतो. पण ती मिळाली नाही. मी जें जें करीत आहें तें सदसद्विवेकबुद्धीला अनुसरूनच करीत आहें. त्यांत माझ्या हितापेक्षा तुझंच हित अधिक आहे. सुहासिनीची व तुझी भेट होणं अत्यंत इष्ट आहे. तुझ्या कर्णपिशाच्चान तुझ्यावर घातलेली मोहिनी उतरविण्यासाठी मीं या सुहासिनी नांवाच्या मांत्रिकाची योजना केली आहे. या मांत्रिकाला असे प्रभावशाली मंत्र माहित आहेत की तो आपल्या मंत्रबलाने शत्रूचे मित्र करून टाकतो. सुहासिनीची भेट होऊं दे की तूं तिच्या गळीं पडशील, तिला कुरवाळशील, तिच्या हृदयावर आपलं मस्तक ठेवून अश्रु ढाळूं लागशील, अशी तिची शक्ति आहे. म्हणून म्हणतों, तिची भेट झाल्याशिवाय तुला मी जाऊं देणार नाहीं.

मन्दाकिनी — पण मी अशी ही बळजबरी कां सहन करूं ?

विद्याधर — या प्रश्नाला या वेळेस उत्तर नाही. आजपर्यंत तूं स्वखुषीन माझ्या इच्छेला मान देत आलीस तोच क्रम यापुढहि चालावा म्हणून मी आज सक्ति करणार आहें, इतकंच. म्हणजे तुला उद्या पश्चात्ताप करण्याची पाळी येणार नाही.

मन्दाकिनी — विद्याधर ?

विद्याधर — छे ! आता वाटाघाट नको. थोडा वेळ हा जुलूम सहन

कर. मग तूंच म्हणशील हा जुलूम होता खरा तरी त्याच्या मुळाशीं सद्धेतुच होता आणि म्हणूनच तो क्षम्य होता. [मन्दा आंत जाते. जिवाजी प्रवेश करतो.]

जिवाजी — सुहासिनीबाई आल्याती.

विद्याधर — पाठवून दे त्यांना आंत. [जिवाजी जातो. सुहासिनी व मंजुळा प्रवेश करतात.]

सुहासिनी — विद्याधर, ह्या प्रसंगाला तोंड देण्याची माझ्यांत शक्ति नाही. जाळून टाका तें विल. झालं इतकं नाटक बस्स झालं. एकदयानच जर ही अवस्था झाली तर पुढ काय होईल ? माझ्यान तें नाही सहन होणार आणि मन्दाताईची काय अवस्था होईल ? तुम्हीं तिच्या मनाची कांही तयारी केली का ?

विद्याधर — नाही. मी तयारी करूं शकलों नाहीं. आमच्या भिकाजी-पंतान व मोहनन जो घोटाळा केला त्यामुळे कांहीच होऊं शकलं नाही. आता जें जें होईल तें तें पाहिलं पाहिजे. परत-ण्याचा विचारच करूं नकोस. मन्दाच्या व माझ्या सुखाकरिता तरी तसला विचार करूं नकोस. आजच्या या दिव्यांतून आपण पार पडलों म्हणजे सारं किल्मिष नाहीसं होईल व पुनः उत्सा-हान जीवितपथ आक्रमावयास हरकत नाही. दुरावलेलीं अंतः-करणं प्रेमबंधनांनी एकत्र होतील, सत्यप्रियतेन विश्वास वाढेल, आणि सौजन्यान जीवित सुखमय होईल. या उज्ज्वल भविष्यावर दृष्टि ठेवून आपण आजच्या प्रसंगाला तोंड दिलं पाहिजे.

सुहासिनी — पण विद्याधर, अतिशय भीति वाटते. हृदयाचा अक्षरशः थरकांप होतो. या क्षणीं मृत्यु येईल तर बरं होईल !

विद्याधर — सुहासिनी, धीर सोडूं नकोस. प्रसंग चमत्कारिक तर खराच पण तो टाळणं शक्य नाही. टाळतां आला असता तर तो मीं

टाळला नसता का ? माझं जीवित आजच्या प्रसंगावर अवलंबून आहे. कसं तें तुला समजणार नाही. थोडक्यांत सांगतों. घट्ट मन करून ऐक. 'सुहासिनी-विद्याधर' हा एक आजकाल लोकांच्या बोलण्याचा विषय झाला आहे. त्याची मला पर्वा नाही, पण या लोकवार्तेला मन्दा बळी पडली आहे. तिच्या मनांत संशय उत्पन्न झाला आहे आणि तिच्या दृष्टीवर रूढ कल्पनांचं पटल आलं आहे. तें तिच्या हिताकरिता व आपल्या हिताकरिता दूर करणं अत्यंत आवश्यक आहे. थोडा धीर धर. सर्व सुव्यवस्थित होईल. हा मी आलोंच. [विद्याधर जातो.]

मंजुळा — सुहासिनी, तूं किती आंतल्या गांठीची आहेस ! या साऱ्या गोष्टी सांगायला तुला आता रस्त्यांतच सवड मिळाली ना ? प्रथम कां नाही सांगितल्यास मला ? तुझी मावशी वेडी आहे खरी; पण तिलाहि अंतःकरण आहे. किती थोर पुरुष आहेत, आणि मी आपली वेड्यासारखी वाटेल त्याच्याजवळ वाटेल तें बोलत असें !

सुहासिनी — तरी अजून तुला पूर्ण कल्पना नाही, मावशी. स्वतःचा संसार असतांना जगाच्या संसाराची काळजी करणारा दुसरा एखादा महात्मा दाखवितां येईल का ? यांनी एवढी तपश्चर्या केली केव्हा ? खरोखर, विद्याधर खरे सत्पुरुष ! खरे साधु !

मंजुळा — तुकाराममहाराजांनी सांगितलेली साधुत्वाची खूण कशी तंतोतंत त्यांना लागू पडते ! "ज्यासी आपंगिता नाही । त्यासी धरी जो हृदयीं । तोचि साधु ओळखावा । देव तेथेची जाणावा ॥"

सुहासिनी — यांच्या सहायाशिवाय या अफाट जगांत माझी काय अवस्था झाली असती !

[हातावर डोकें ठेवून स्वस्थ बसते. विद्याधर व मन्दा प्रवेश करतात.]

विद्याधर — सुहासिनी, ही माझी मन्दा.

सुहासिनी — (आपल्या तंद्रींतून जागी होऊन) काय म्हटलंत ?

विद्याधर — तुझी आणि मन्दाची ओळख करून देतों.

सुहासिनी — ओळख करून द्यायची आवश्यकता नाही. आम्ही एक वेळ वर्गभगिनी होतों. मन्दा, आज मी भगिनीप्रेमाची भिक्षा मागायला आलें आहें.

[मन्दाकिनी स्तब्ध राहते व शून्य मनाने इकडे तिकडे पाहते.]

विद्याधर — मन्दा, तूं शुद्धीवर आहेस ना ?

मन्दाकिनी — मी खरीच शुद्धीवर आहें का ? मी आहें तरी कुठ ? मला कांहीं समजेनासं झालं आहे. असं वाटतं की मला पर्वताच्या उत्तुंग शिखराखाली खोल दरींत कोणीतरी लोटून देत आहे. (घाबरल्यासारखें करते.) विद्याधर, मला निष्कारण हा बंदीवास कशाला ? मला जाऊं द्या. एखाद्या तिऱ्हाइतान माझा कडेलोट करण्यापेक्षा मीच स्वतःचा नाश करून घेईन !

सुहासिनी — मन्दा ! मन्दा ! मला क्षमा कर. आपण भिन्न मार्गांनी जाणारीं लोकं. तुझी भेट घेण्याचा प्रयत्न केला हेंच चुकलं. विद्याधर, जातें मी.

मन्दाकिनी — तूं कशाला ? मींच जातें. तूं या जगांत निराधार आहेस.

सुहासिनी — पण तूं येथून गेलीस म्हणजे तूंहि निराधार होशील ! निराधारपणाच सुख माझ्या इतकं चांगलं परिचयाचं आहे की असला प्रसंग वैऱ्यावर सुद्धा येऊं नये असं वाटतं. मग तूं तर माझी........

मन्दाकिनी — (वेडाच्या भरांत बोलल्याप्रमाणे) मी तुझी कोण ! सुहासिनी, तुझा माझा संबंध काय ?.... तूं कोण ? कुठली ?.... हो. मीं काय म्हटलं ?.... चुकलें !.... संबंध नाही असं नाही....

मग कोण ?.... सुहासिनी...., सुहासिनी.... तूं माझी सवत नाहींस का ?

सुहासिनी — (कानांवर हात ठेवते. दुःखाने) ता.... ई.... (किंकाळी फोडते आणि पडते. मन्दाकिनी चकित होते आणि तिला साव-रायला जाते तों मंजुळा तिला बाजूस करून सुहासिनीचें डोकें आपल्या मांडीवर घेते व विद्याधर वारा घालतो. मन्दाकिनी वारा घालण्याचा प्रयत्न करते. मंजुळा तिचा हात दूर करते.)

मंजुळा — नको. नुसत्या शब्दान हिला घायाळ केलंस. वारा घालून तिचे प्राणच उडवून लावशील.

[नानासाहेब, भिकाजीपंत व मोहन प्रवेश करतात.]

नानासाहेब — हें काय ? हिला घेरी कशान आली ?

विद्याधर — मनावर फाजील ताण पडल्यामुळ. [सुहासिनी शुद्धीवर येते. मन्दा एकदम दूर होते.]

विद्याधर — आता मला थोडं बोलूं द्याल का ? सुहासिनी, या कोचावर बैस. (मन्दाकिनी बोलण्याचा प्रयत्न करते.) नाही. आता थोडा वेळ मी कोणासहि बोलूं देणार नाहीं. चूप, मन्दा. सुहासिनी, अगदी कांही बोलायचं नाही. सुहासिनीच्या आईच्या इच्छेप्रमाण मीं तिचं मृत्युपत्र वाचणार आहें तें ऐका. (मृत्युपत्राचा लिफाफा फोडतो.) "मी वास्तविक मृत्युपत्र लिहून ठेवावयास नको आहे. कारण मला नातेवाईक नसल्यामुळे माझी सर्व संपत्ति माझी मुलगी सुहास इला ओघानेच मिळणार आहे. बॅरिस्टर विद्याधर यांचा माझा परिचय झाला नसता तर हें मृत्युपत्र मीं लिहिलें नसतें. माझी प्रेमळ कन्या सुहास ही सद्‌वृत्त, सुशील व निर्लोभ असल्यामुळे कायदेशीर रीतीने हें मृत्युपत्र तयार न करितां केवळ माझी अखेरची इच्छा या ठिकाणीं नमूद करतें

व ती इच्छा सुहास पुरवील अशी मला खात्री वाटते. माझ्या जीविताचा इतिहास चमत्कारिक आहे. तो मी बॅरिस्टर विद्याधर यांना पत्राने कळवीत आहें. हें मृत्युपत्र वाचण्यापूर्वी त्यांनी आपल्या पत्नीला तो कळविला असेलच. मी समाजबहिष्कृत, पापमार्गी स्त्री. माझ्या पापाचीं फळें माझ्या मंडळींना भोगावीं लागणार हें साहजिकच आहे. नानासाहेब इनामदार यांची कन्या मन्दा ही माझीच कन्या असून तिचा मीं त्याग केल्या-नंतर ती त्यांच्या हातीं पडली व त्यांनी तिचें पालनपोषण केलें. बॅरिस्टर विद्याधर यांच्या उदार मनाचा मला परिचय नसता तर ही गोष्ट मीं कालत्रयींहि जगापुढे आणली नसती. तिला माझ्या इस्टेटीपैकी ५००० रुपये मिळावे अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे. माझी उरलेली स्थावर जंगम इस्टेट जवळ जवळ तितक्याच किंमतीची माझी दुसरी कन्या सुहास इला देत आहें. माझ्या सहवासामुळे सुहासला तिच्या वडील बहिणीप्रमाणे समाजांत मानाचें स्थान मिळण्याजोगें नसलें तरी बॅरिस्टर विद्याधर व मन्दा यांनी तिच्यावर देखरेख करावी अशी माझी इच्छा आहे." (स्तब्धता)

मन्दाकिनी — सुहास...

सुहासिनी — ताई.... (दोघी एकमेकींना कडकडून भेटतात. सुहासिनी मन्दाच्या हृदयावर मस्तक ठेवते व अश्रु ढाळते. मन्दा तिला कुरवाळते.)

विद्याधर — भिकाजीपंत, मोहन, पाहा हा देखावा डोळे भरून. (भिकाजीपंतास) शुद्धतेचा अभिमान बाळगणाऱ्या तुमच्या जुन्या दृष्टीला जिकडे तिकडे नेहमी पापच दिसायचं! आज मन्दा घर सोडून गेली असती तर त्याला जबाबदार कोण? जा.

चालते व्हा. फक्त ही मौज तुम्हांला दाखवावयाची होती. जा.

भिकाजीपंत — साहेब, आपण थोर उदारधी आहांत. मी चुकलों. साधारण जगाच्या मापान मीं आपणांस मोजलं. क्षमा करा.

मोहनराव — मन्दा, धाकटी बहीण भेटल्याच्या आनंदांत बेहोष होऊं नकोस. बायकोसारखीच मेहुणी दिसायला असली म्हणजे बायकोला पाहून मेहुणीची आणि मेव्हणीला पाहून बायकोची आठवण होऊं लागते व शेवटीं शेवटीं दोघांतला फरकच नाहींसा होतो. बहिणीच्या नवऱ्यावर प्रेम करण्याची साथ देखील गांवांत सुरू आहे. लक्षांत ठेव.

नानासाहेब — (त्वेषाने) मोहन ! चांडाळा, तुझ्या मनांत आहे तरी काय?

मोहनराव — म्युनिसिपॉलिटींत सांगून येतों की या सांथींतील पहिलीच केस फेटल झाली म्हणून !

(भिकाजीपंत, मोहन, जिवाजी जातात.)

जिवाजी — (जातां जाता) भिकाजीपंत, आग तर झून चालली !

मन्दाकिनी — विद्याधर.... विद्याधर.... विद्या.... (मन्दा बोलण्याचा प्रयत्न करते. पण बोलूं शकत नाही.)

नानासाहेब — मन्दा, मन शान्त ठेव.

मन्दाकिनी — नानासाहेब, आता शान्ति कुठली? विद्याधर.... विद्याधर... माझ्या मोठेपणाच्या पोकळ अभिमानाबद्दल कसं चांगलं चरचरीत अंजन परमेश्वरान माझ्या डोळ्यांत घातलं बरं ! विद्याधर, सहन होत नाही हो ! परिस्थितीन माझ्या अंतःकरणाची चालविलेली ही ओढाताण कशी सहन करूं ? मन्दा म्हणजे स्वाभिमान असा लौकिक होता त्याचे तुकडे तुकडे झाले. रस्त्यावरील एखाद्या भिकारणीप्रमाण मन्दा अनाथ झाली आहे.

सुहासिनी — ताई.... ताई....

विद्याधर — मन्दा, हें काय असं वेड्यासारखं करावं बरं? नानासाहेब, आपण तरी कांही सांगा!

नानासाहेब — मन्दा, कांही गोष्टी मनुष्याच्या आटोक्याबाहेर असतात; त्याबद्दल वाईट तें काय वाटून घ्यायचं? जगांत तुझी प्रतिष्ठा तुझ्या गुणांमुळं, तुझ्या बुद्धिमत्तेमुळं, तुझ्या कर्तबगारीमुळं आहे. इथ जन्माचा आणि कुलाचा काय संबंध? सुहासिनी आणि मन्दा या बहिणींच्या जोडीकडे पाहून अशा कन्या आपल्याला असाव्यात असं कोणत्या आईबापांना वाटणार नाही? पत्नी म्हणून, कन्या म्हणून, भगिनी म्हणून, माता म्हणून यांच्याकडे पाहतांना कोणाला अभिमानाचं भरतं येणार नाही?

मन्दाकिनी — या बोलण्याचा माझ्यावर काय परिणाम होणार! विद्याधर, तुम्हांला तोंड दाखवायची मला लाज वाटते. तुमचा दिव्य उदारपणा कुणीकडे व माझा पोकळ अभिमान, पोकळ डौल कुणीकडे! गेल्या दोन दिवसांत मीं तुम्हास जें छळलं त्याची मला क्षमा कराल का? मी तुमची अनन्त अपराधी आहें.

विद्याधर — मन्दा, तुझा छळ पुरवला पण हें असलं बोलणं नको. ती पाहा सुहासिनी कशी भेदरल्याप्रमाण करते आहे!

मन्दाकिनी — सुहास, मी माझ्या पश्चात्तापांत तुला अगदीच की ग विसरलें! सुहास, आपण सख्या बहिणी. पण बहीण म्हणून आपली आज प्रथम गांठ पडावी ना? आणि मी अशी दुर्दैवी की घरीं चालून आलेली बहीण आपल्या हातान दूर लोटीत होतें. विद्याधर, तुम्ही धीराचे म्हणून मला माझी बहीण मिळाली!

सुहासिनी — ताई, विद्याधर खरोखर थोर पुरुष आहेत! त्यांचं सर्वच कांही अलौकिक! (सुधीर प्रवेश करतो.)

सुधीर — हा. पाहा सांगितल्याबरहुकूम आलों !

मन्दाकिनी — सुधीर ! गेल्या दहा मिनिटांत जो मला अनुभव आला आहे, त्यान मी अंतर्बाह्य बदलून गेलें आहें. आणि त्या अनुभवानंतर प्रथम आठवण झाली असेल तर तुमची. ज्या परिस्थितींत आपण दूर झालों ती परिस्थिति मूर्तिमंत माझ्या डोळ्यांसमोर उभी आहे. माझा निर्दयपणा आज माझ्या प्रत्ययास आला आहे. सुधीर, त्या वेळीं बोललेले माझे शब्द मी परत घेतें. स्वतःचं नाक नकटं असतांना दुसऱ्याच्या नकटेपणाबद्दल हसण्यासारखा तो हास्यास्पद प्रकार झाला. सुधीर, ही माझी बहीण सुहासिनी.

सुधीर — आजचा दिवस परम भाग्याचा आहे खास. विद्याधर, मी आज अनुपम सुखाचा अनुभव घेत आहें. मन्दा, सुहासिनी, तुम्हांला पाहून माझं अंतःकरण उचंबळून आलं आहे. बाळपणापासून दुरावलेलीं भावंडं एकत्र व्हावींत त्याप्रमाण मला झालं आहे. माझ्या एकाकी अंतःकरणाची हुरहूर आज कशी आपोआप बंद पडली पहा ! आज माझ्या जीवितांचं सार्थक झालं.

विद्याधर — खरोखर, इतका आनंदाचा दिवस मीं माझ्या साऱ्या आयुष्यांत पाहिला नसेल.

अंक तिसरा समाप्त